प्रतिमा, पांडित्य आणि प्रचार
यांचा
सुंदर संगम साधणारे
'काळ' कर्ते
**शिवराम महादेव परांजपे**
यांच्या स्मृतीस

# दोन शब्द

वीस वर्षांपूर्वी माझे स्नेही श्री. मेघश्याम शिरोडकर यांनीं सावंतवाडीला वैनतेय हें साप्ताहिक सुरू केलें तेव्हां मी त्यांत नियमितपणानें लिहित असे. पुढें शाळेचा व इतर लेखनाचा व्याप फार वाढल्यामुळें वैनतेयाकडे माझें दुर्लक्ष झालें. मात्र आतां परत कोंकणांत गेल्यावर वैनतेयांत नियमित लिहायचें असा संकल्प कोल्हापुरांत बसून गेलीं तीन चार वर्षें मी करीत होतों. इतक्यांत माझे स्नेही श्री. माधवराव बागल यांनीं 'अखंड भारत' हें साप्ताहिक इथें सुरू करून माझें लेखनसाहाय्य मागितलें.

वृत्तपत्राचा व्यवसाय हा धंदा नसून धर्म आहे ही टिळक–आगरकरांनीं प्रवर्तित केलेली आणि परांजपे, खाडिलकर, केळकर, अच्युतराव कोल्हटकर प्रभृतींनीं संवर्धित केलेली निष्ठा आजच्या महाराष्ट्रांतही जागृत आहे ही मोठी अभिमानाची गोष्ट आहे. गेल्या सात आठ वर्षांतलें जावडेकर, शिवरामपंत करंदीकर, गाडगीळ, घोरपडे, चिटणीस, माडखोलकर प्रभृतींचें लेखन ही पवित्र परंपरा पुढेंहि अखंड चालणार अशीच ग्वाही देत आहे. सावंतवाडीचे शिरोडकर किंवा कोल्हापूरचे बागल यांच्या वृत्तपत्रांचीं कार्यक्षेत्रें लहान असलीं तरी त्यांचा राष्ट्रीय बाणा आणि त्यांची ध्येयनिष्ठा या गोष्टी या थोर परंपरेला शोभण्याइतक्या उज्ज्वल आहेत हें मी अनुभवानें सांगूं शकतों. त्यामुळें माधवरावांनीं माझ्याकडे लेखनाची मागणी करतांच मला त्यांना होकार द्यावा लागला. या संग्रहांतले 'एक भास' व 'विसरलेला संदेश' हे दोन लेख सोडून बाकी सर्व लेख त्यांच्या 'अखंड भारत' मधूनच यंदा प्रसिद्ध झाले आहेत. माधवराव मागें लागले नसते तर या प्रकारचें लेखन–निदान सध्यां तरी–मी करूं शकलों नसतों. हा संग्रह वाचून कुणालाहि वाङ्मयीन अथवा अन्य प्रकारचा आनंद क्षणभर झाल्यास त्याचें सर्व श्रेय माधवरावांना आहे.

वृत्तपत्रें, ललितवाङ्मय व चित्रपट हीं तिन्ही सामाजिक क्रांतीला पोषक अशीं प्रभावी साधनें आहेत यांत शंका नाहीं. पण गल्लाभरू मालक व ध्येयशून्य कलावंत यांच्या कात्रींत सांपडलेली सध्यांची हिंदी चित्रसृष्टि नाचगाण्यांपलीकडे क्वचितूच पाऊल टाकतांना दिसते. अनेक प्रमुख ललितसाहित्यिकांनीं 'लोकजागृति हेंच आमचें ब्रीद आहे' अशा मोठमोठ्या पाट्या अलीकडे आपल्या गळ्यांत अडकवून घेतल्या असल्या, तरी त्यांच्या गळ्यांतून अजून अंतःपुरांतले सूरच बाहेर पडत आहेत. अशा स्थितींत विचारक्रांतीची धुरा वृत्तपत्रांनींच वाहिली पाहिजे हें उघड आहे. या कार्यांत महाराष्ट्र सदैव अग्रेसर रहावा हीच त्याच्या पूजेकरितां या साध्या 'मंजिऱ्या' खुडणाऱ्या माझ्यासारख्या भक्ताची इच्छा असणार !

खासबाग, कोल्हापूर.<br>२–१०–४४

वि. स. खांडेकर

# अनुक्रमणिका


| | | |
|---|---|---|
| १ | कुठं आहे तो मेघ ? | ९ |
| २ | एक पिढी | १५ |
| ३ | माकडाची स्मशानयात्रा | १९ |
| ४ | एक भास | २४ |
| ५ | सतरा जून | ३२ |
| ६ | कवि, चोर आणि पोलीस | ३९ |
| ७ | नवें जग | ४६ |
| ८ | अनावृत्त पत्र | ५० |
| ९ | विसरलेला संदेश | ५६ |
| १० | अंध श्रद्धा | ६५ |
| ११ | महात्म्यांचे अश्रू | ७० |
| १२ | गोष्ट जुनीच आहे | ७५ |
| १३ | गंबुशियाचा विजय होवो ! | ८२ |
| १४ | काळे आणि गोरे | ८६ |
| १५ | बुद्धीचा बाजार | ९३ |
| १६ | वेडा हत्ती | ९८ |
| १७ | निखारे विझत नाहींत | १०२ |

# कुठं आहे तो मेघ ? १

दुपारपासून फार उकडत होतें. अंगाला नुसत्या घामाच्या धारा लागल्या होत्या. वाऱ्याचें पुसट अस्तित्वसुद्धां जाणवत नव्हतें. जणु कांहीं त्याचें आणि सृष्टीचें भांडण होऊन तो कुठेंतरी रुसून निघून गेला होता ! वारा नसल्यामुळें गुदमरल्यासारखें होत होतें. अजिबात वारा नसण्यापेक्षां उन्हाच्या झळासुद्धां माणसाला पुरवतात. कसलेंही हक्क नसलेल्या देशांत निदान भाषणस्वातंत्र्य मिळालें म्हणजे तेवढेंच बरें वाटतें ना ! उन्हाळयांत गरम गरम झळा येऊं लागल्या कीं तसेंच हायसें वाटतें. आणखी थोड्या वेळानं या उष्ण झळा निवतील आणि थंडगार वारा सुटेल अशी आशा तरी त्यामुळें माणसांच्या मनांत घालवूं शकते.

पण त्या दिवशींच्या उकाड्याचा साराच नूर न्यारा होता. वाऱ्याचा सृष्टीशीं घटका दोन घटका चालणारा प्रेमकलह झाला नसून घटस्फोटाची मजल गांठण्या-इतकें त्या दोघांचें कडाक्याचें भांडण झालें असलें पाहिजे अशी कल्पना माझ्या मनांत पुनःपुन्हां येऊं लागली. अंगांतून गळणाऱ्या घामाच्या धारा पाहून कुणीतरी टांचणीनें आपल्या शरीराला शेंकडों भोंकें पाडलीं असावींत असाहि विचित्र भास मधून मधून होई. 'दारिद्र्यानें उपाशीं मरणाऱ्या जनतेला कायदेमंडळाच्या हक्काचा' जेवढा उपयोग होतो, तेवढाच मला हातांतल्या पंख्याचा होत होता. आज चुकून सूर्यानें बारा डोळे उघडले तर नाहींत ना अशी शंकासुद्धां माझ्या मनांत आल्या-वांचून राहिली नाहीं. मी गच्चींत जाऊन बाहेरच्या भणभणणाऱ्या उजेडाकडे पाहूं लागलों. जिकडे तिकडे ऊन रणरणत होतें. सारें आकाश अगदीं लखलखीत दिसत होतें. मात्र दूर क्षितिजाच्या एका कोपऱ्यांत तळहाताएवढा एक काळा ढग हळूच पाण्यांतून वर डोकावून पाहणाऱ्या माशाप्रमाणें हालचाल करीत होता.

त्या ढगाकडे मी कौतुकानें निरखून पाहूं लागलों. गुलामगिरीनें गांजलेल्या राष्ट्रांत एखाद्या एकाकी देशभक्तानें आपलें अस्तित्व धैर्यानें दर्शवावें, तसा तो

छोटा मेघ वाटला मला. मी पाहत होतोंच—क्षणाक्षणाला त्याचा आकार वाढूं लागला. हां हां म्हणतां त्या माशाचें मांजराच्या पिलांत आणि त्या काळ्या मांजराच्या पिलाचें मोठ्या प्रचंड हत्तींत रूपांतर झालें. तो काळा हत्ती पुढें पुढें सरकूं लागला. त्याच्यामागून अनेक लहानमोठे हत्ती दिसूं लागले. रानटी हत्तींच्या त्या कळपानें सारें आकाश व्यापून टाकलें. आतां लवकरच पाऊस पडणार, आपल्या सोंडेंतून भरून आणलेलें स्वर्गंगेचें पाणी प्रत्येक छोटा मोठा हत्ती तापलेल्या पृथ्वीवर उधळून तिला शांत करणार, या कल्पनेनें माझें मन आनंदित झालें.

इतक्यांत सोसाट्याचा वारा सुटला. दहावीस लाखमाणसांच्या जत्रेंत पालखींतल्या मूर्तीवर सर्वांकडून एकसारखा अबीरबुक्का उधळला जात असावा तशी भिरभिरत वर उसळणारी धूळ वाढूं लागली. दाही दिशा त्या धुळीनें भरून गेल्या. डोळ्यांत धूळ जात असतांनाही माझें सारें लक्ष ढगांच्या त्या पुढाऱ्यावर-आभाळांत अगदीं पहिल्यांदा दिसूं लागून मोठ्या झालेल्या त्या मेघावर—होतें. आतां मधून मधून त्याच्यांतून वीज चमकूं लागली होती. माझ्या मनांत आलें ही वीज नाहीं. या बंडखोर मेघांचा विजयी झेंडा असावा हा! सूर्याच्या असह्य तापानें गांजून गेलेल्या अन्नाच्या अभावीं भकास दिसणाऱ्या, जलप्रवाहाच्या साध्या वस्त्रालाही महाग झालेल्या धरित्रीमातेला नवजीवन देण्याकरतां स्वर्गांत सुरू झालेल्या क्रांतीचा हा पहिला क्षण असावा. आकाशांत चमकणारी वीज हा त्या क्रांतीचा मंगल ध्वज आहे.

पण माझी कल्पना ही नुसती कविकल्पना आहे, हें दुसऱ्याच क्षणीं माझ्या लक्षांत आलें. तो पुढें असलेला विशाल मेघ आतां खालीं उतरला होता. शहरांतल्या घराघराजवळून तो विमानाप्रमाणें घिरट्या घालीत आहे असा भास होत होता. त्याच्यांतून चमकणारी वीज हा त्याचा ध्वज नव्हता. ती त्याच्या हातांतली विजेची बत्ती होती. प्रत्येक लहानमोठ्या घराच्या खिडकीपाशीं डोकावून त्या बत्तीच्या प्रकाशांत तो मेघ काय धुंडाळीत होता कुणाला ठाऊक!

सारें आभाळ काळवंडलें होतें. लहानमोठे ढग गडगडत होते. मधून मधून वीज चमकत होती. आतां पांचदहा मिनिटांत मुसळधार पाऊस कोसळणार आणि जिकडे तिकडे स्वच्छ, शांत, गार होणार अशीं लक्षणें दिसत होतीं.

● ● ●

मी चहा पिऊन पुन्हां गच्चींत आलों. अवघ्या दहा मिनिटांत केवढा बदल झाला होता बाहेर! विजेचा कारखाना एकदम बंद पडल्यामुळें काळोख्या रात्रीं गांवावर जशी अवकळा पसरावी तसें मघाशीं आभाळ दिसत होतें. पण आतां तें भराभर उजळूं लागलें. टोळधाडीप्रमाणें आलेले ते लहानमोठे ढग एकाएकीं कुठें गुप्त झाले देव जाणे! जवळ जवळ स्वच्छ होत आलेलें तें आकाश पाहून माझ्या मनांत एक निराळीच कल्पना येऊन गेली—समुद्रकांठच्या वाळवंटावर लहान लहान खेकडे नेहमीं स्वैर संचार करीत असतात. ते ढगही आकाशाच्या वाळवंटांत तसेच खेळत असावेत. आणि ते छोटे खेकडे (कोकणांत कुरल्या म्हणतों आम्ही त्यांना! किती काव्यमय नांव आहे नाहीं?) माणसाची चाहूल लागली कीं कसे पटकन् वाळूंतल्या इवल्या इवल्याशा बिळांत जातात! मघाचे ढगही तसेच आकाशांतल्या आपआपल्या गुहांत लपून बसले असावेत!

इकडे पृथ्वीच्या शरिराची आग आग होत होती; आणि तिकडे ती शांत करण्याची शक्ति असलेले ढग लपून बसले होते; त्यांच्या त्या पळपुटेपणाचें कारण मात्र माझ्या कल्पनेला शोधशोधून सुद्धां सांपडेना. शेवटीं मीं स्वतःचें समाधान करण्यासाठीं म्हटलें, 'कुठलीही क्रांति अशीच असते. ती आतां होणार, क्षणांत होणार असं भोंवतालच्या परिस्थितीवरून वाटूं लागतं. पण कांहीं तरी कारण घडतं आणि क्रांति लांबणीवर पडते!'

माझ्या या कल्पनेचा उपहास करण्याकरतांच कीं काय कुणीतरी खदखदून हंसलें असा मला भास झाला. विचाराच्या तंद्रींतून जागा होऊन मी पाहूं लागलों. मघांच्या मेघांच्या सैन्याचा तो पुढारी—क्षितिजावर प्रथम दिसूं लागलेला तो काळा ढग—परत जातां जातां गडगडत होता! त्याचें तें विचित्र हास्य ऐकून मी चिडून गेलों. मी त्याला उद्देशून उच्च स्वरानें म्हणालों, 'मेघा, तूं कांहीं उच्च कुळांतला दिसत नाहींस. आज इतका उकाडा होत असतांना पृथ्वीवर पाण्याचे चार थेंब शिंपडण्याचं औदार्य सुद्धां तुला दाखवतां आलं नाहीं. तुझ्यापेक्षां आमची म्युनिसिपालिटी हजारपटींनीं बरी! लग्नांत हातरुमालावर गुलाबपाणी शिंपडतात ना! तशी ती धुळींत भरलेल्या आमच्या राजरस्त्यांवर दररोज नियमितपणें जलसिंचन करीत असते! पण तूं—छेः! तुझे पूर्वज फार कद्रू असले पाहिजेत! मेघांत सुद्धां तिमाजी नाईक असतात हें आज कळलं मला!'

तो मेघ गडगडतच माझ्याशीं बोलूं लागला. माझ्या टीकेचा त्याला बहुधा राग

आला असावा ! तो म्हणाला, ' हे मानवा, अलीकडे बुद्धीच्या नांवाखालीं कुतर्क करीत बसण्यांत मनुष्य फार पटाईत झाला आहे असें स्वर्गांत आज सकाळींच बृहस्पति म्हणत होते. तुझं हें बोलणं ऐकून मला त्यांचा तो मानवजातीवरचा आरोप खरा वाटूं लागला आहे. वेड्या माणसा, मी कुणाचा वंशज आहे याची तुला काडीची तरी कल्पना आहे का ? विरहानें व्याकुळ झालेल्या कालिदासाच्या यक्षानं कुबेरनगरींत राहणाऱ्या आपल्या प्रिय पत्नीला निरोप पोंचविण्याकरतां ज्या दिव्य मेघाची योजना केली होती, त्याच्याच वंशांत माझा जन्म झाला आहे. रामगिरीवरल्या त्या स्थानबद्ध यक्षाच्या शब्दासाठीं माझ्या प्रेमळ पूर्वजानं किती लांबचा प्रवास केला होता हें तुला ठाऊक आहे ना ? '

माझ्या डोळ्यांवर माझा विश्वासच बसेना !

मेघदूतांतल्या अमर मेघाच्या वंशजाशीं मी बोलत होतों ! क्षणभर केवढा आनंद झाला मला ! पण दुसऱ्याच क्षणीं अंगांतून वाहाणाऱ्या घामाच्या धारांकडे माझें लक्ष गेलें. रागापेक्षां थट्टेचाच पुष्कळ वेळां अधिक उपयोग होतो हें लक्षांत आणून मी त्या मेघाला म्हणालों, ' मित्रा, तुझ्या त्या पूर्वजानं यक्षपत्नीच्या खिडकीपाशीं जाऊन तिच्या पतीचा निरोप तिला पोंचविला. त्याचा तो गुण तुझ्यामध्येंही उतरलेला दिसतोय् ! तूं मघाशीं आमच्या गांवांतल्या प्रत्येक घराच्या खिडकीपाशीं जाऊन डोकावून पहात होतास ! होय ना ? '

मेघ हंसला.

मीं त्याला हळूच प्रश्न केला, ' कुणाचा नाजुक निरोप पोंचवायचा होता वाटतं तुला ? '

मेघानें उत्तरादाखल एक भला मोठा सुस्कारा सोडला.

त्या सुस्काऱ्याचा अर्थंच कळेना मला ! या मेघाला इतकें कसलें विलक्षण दुःख झालें असावें ? त्याच्या डोळ्यांतून दोन अश्रुबिंदूही गळून पडले असा मला भास झाला. मी स्तब्ध राहिलों. शब्दापेक्षां मौनच पुष्कळ वेळां अधिक सहानुभूति दर्शवूं शकतें.

पांच दहा क्षणांनीं तो किंचित् शांत होऊन बोलूं लागला. तो म्हणाला, ' मित्रा, कुणाला तरी सांगितल्याशिवाय दुःख हलकं होत नाहीं असं म्हणतात !

म्हणून मी तुझ्याशीं मन मोकळं करून बोलतों, आतापर्यंत कुणापाशीं मी चकार शब्दसुद्धां बोललों नव्हतों या बाबतींत !

हाताखालचे शेंकडों ढग घेऊन पाऊस पाडण्याकरतांच मघाशीं मी आलों होतों. माझं कर्तव्य आहे तें. पण पाण्याचा एक थेंबही पृथ्वीवर पडला नाहीं ! उकाड्यांत तळमळणाऱ्या साऱ्या लोकांनीं आमचं मघाचं अवडंबर पाहून आम्हाला शिव्याशाप दिले असतील ! आज चांगला पाऊस पडला तर पेरे करायला मिळतील म्हणून आशाळभूतपणानं आमच्या आगमनाकडे डोळे लावून बसलेल्या शेतकऱ्यांनीं आम्हाला शिव्यांची लाखोली वाहिली असेल ! पण —'

त्याला मधेंच थांबवून मी म्हणालों, ' पण काय ? शरदृतूतले ढग क्षुद्र माणसांप्रमाणें नुसती बडबड करतात, कृति कधींच करीत नाहींत असं संस्कृत शिकतांना मीं पाठ केलं होतं ! आतां या इंग्रजी राज्यांत संस्कृत सुभाषितेंसुद्धां खोटीं ठरूं लागलेलीं दिसतात ! ग्रीष्मऋतूंतले तुझ्यासारखे ढगही बोलकेच असतात हें—'

मला मधेंच थांबवून मेघ म्हणाला, ' मित्रा, मोठा अन्याय करतो आहेस तूं मला ! तूं माझी कहाणी क्षणभर ऐकशील तर—'

आवंढा गिळून तो पुढें बोलूं लागला, ' गतवर्षीं बंगालमधें पाऊस पाडण्याकरतां जीं मेघांचीं पथकं स्वर्गांतून रवाना झालीं त्यांचा नायक होतों मी ! आम्ही आमचं काम चोख केलं होतं. पण, बंगाल्यांत एकदम भयंकर दुष्काळ पडला. यमदेवाचं काम बेफाम वाढलं. त्यानं कंटाळून इंद्रदेवाकडं तक्रार केली. इंद्रानं कांहींएक चौकशी न करतां आम्हीं मेघांनीं आपल्या कर्तव्यांत कसूर केली असें ठरवून आम्हाला अंधारकोठड्यांत डांबून टाकलें. पुढारी म्हणून मला तर अधिकच शिक्षा झाली. आज सकाळींच माझी मुक्तता झाली. लगेच महाराष्ट्रांत पाऊस पाडण्याची कामगिरी माझ्यावर इंद्रदेवानं सोंपविली. गतावर्षासारखी गफलत होतां कामा नये असंही त्यानं मला बजावलं. माझ्या मदतनिसांना घेऊन मी मोठ्या आनंदानं धांवतच आलों, आम्ही पाऊस पाडायला सुरवात करणार इतक्यांत एक विलक्षण कल्पना माझ्या मनांत येऊन गेली. गतवर्षीं बंगालमधें लोक मेले ते साठेबाजीमुळें आणि शिक्षा झाली मात्र आम्हां मेघांना ! यंदा कांहीं झालं तरी दुसऱ्यांच्या दुष्कृत्यांकरतां शिक्षा भोगायची नाहीं ! गतवर्षीं बंगालमधें आम्ही

नेहमींप्रमाणं डोळे मिटून पाऊस पाडला. पण पाऊस पडूनही तिथं दुष्काळ पडला. धान्य कितीही पिकलं तरी माणसं हवा तेवढा मोठा दुष्काळ पाडूं शकतात याची तोंपर्यंत आम्हांला कल्पनाच नव्हती !

मघाशीं मी प्रत्येक घराच्या खिडकीपाशीं जाऊन डोकावून पहात होतों तें हेंच. प्रत्येकाच्या घरांत ज्याच्या त्याच्या जरुरीप्रमाणें धान्य आहे कीं नाहीं ! पाहतां पाहतां माझी निराशा झाली. कांहीं घरांत भातानें भरलेल्या कणग्याच कणग्या मला दिसल्या. पण हजारों घरांतल्या मडक्यांत संध्याकाळचे तांदूळसुद्धां नव्हते, अशा स्थितींत मीं कितीही पाऊस पाडला तरी इथेंही गतवर्षींसारखाच प्रकार होणार म्हणून मी माझ्या मदतनिसांना गप्प राहण्याचा हुकूम दिला. ते सारे लगेच परत गेले. मीही आतां इंद्रदेवाकडे जात आहें. जोंपर्यंत पिकवायचें एकानें आणि खायचें दुसऱ्यानें अशी या पृथ्वीवर स्थिति आहे. खुशालचेंडूंची चंगल आणि काम करणारांना टंगळमंगळ अशा पद्धतीनें धनधान्याची वांटणी होत आहे, जबाबदार माणसं जनतेच्या पोटापेक्षां आपल्या बँकबुकाचीच काळजी करीत आहेत, तोंपर्यंत आम्हीं मेघांनीं कितीही व्यवस्थित काम केलं तरी—'



प्रचंड गडगडाट होऊन तो मेघ एकदम दिसेनासा झाला. त्याच्या त्या आकस्मिक जाण्यानें मोठी चुटपूट लागली माझ्या मनाला ! त्याच्याशीं खूप खूप खूप बोलायची इच्छा होती माझी !

हल्लीं दररोज संध्याकाळीं आकाशांत ढग जमूं लागले, कीं मी त्यांच्याकडे उत्सुकतेनें पाहतों. पण माझा मित्र त्या गर्दींत मला कुठेंच दिसत नाहीं.

आपल्या आज्ञेचा भंग केल्याबद्दल रागावून इंद्रानें त्याला पुन्हां अंधारकोठडींत डांबून टाकलें असेल काय ? का पृथ्वीवर विलक्षण विषमता निर्माण झाली आहे म्हणून विष्णूच्या दारांत बसून त्यानें पुन्हां अवतार घ्यावा म्हणून माझ्या मित्रानें सत्याग्रह आरंभला आहे ?

कुणाला ठाऊक ! पण तो मेघ पुन्हां भेटावा, त्याला आणखी पुष्कळ गोष्टी विचाराव्यात, असें राहून राहून माझ्या मनांत येतें.

आणि म्हणून आकाशांत ढग जमूं लागलेले दिसले, कीं मी त्यांना अधीरतेनें एकच प्रश्न विचारतों, ' कुठें आहे तो माझा मित्र ! कुठं आहे तो मेघ ? '

## एक पिढी

## २

आंब्याप्रमाणें पत्रांतही अनेक जाती असतात. कांहींचें बहिरंग अधिक सुंदर असतें, तर कांहींचें अंतरंग अधिक मधुर असतें. अशा मधुर पत्रांत बालमित्रांच्या पत्रांची मी नेहमींच गणना करतों. हीं पत्रें बहुधा लहान—अगदी छोटीं—असतात. पण कांहीं कांहीं बिटके रायवळ आंबे चोखायला फार चांगले असतात नाहीं ? बालमित्रांचीं पत्रेंही त्यांतल्या जिव्हाळयामुळें अशींच गोड वाटतात.

माझा कॉलेजमधला दोस्त बापू याचें परवां पत्र आलें तें मीं पुनः पुनः वाचलें, याचें कारण त्यांत ही अवीट गोडी होती. हें तर खरंच ! पण यापेक्षांही महत्त्वाचें कारण म्हणजे बापूनें त्यांत मला दिलेली धमकी हें होय ! त्यानें चक्क लिहिलें होतें—' तुझ्या साऱ्या सबबी मला अगदीं पाठ आहेत. नंबर एक—प्रकृतीच अस्वास्थ्य. नंबर दोन—चित्रपटाचं काम, नंबर तीन—

तूं या सबबींचे फॉर्म्सच छापून घे आतां. जाऊं दे तें. तूंच कुठें तरी लिहिलें आहेस पहा—' लंगडी असून चालणारी अशी एकच गोष्ट जगांत आहे. ती म्हणजे सबब. ' तेव्हां हा निर्वाणीचा खलिता समजून आमच्या मोफत वाचनालयाच्या रौप्यमहोत्सवाकरतां यायची कबुली दे. टंगळमंगळ चालणार नाहीं. उगीच बडबड करशील तर एकदम कोल्हापूरवर स्वारी करीन आणि टोपलींत कोंबडीं घालतात तसा तुला टांग्यांत घालून आमच्या महोत्सवाकरतां घेऊन येईन ! '

आईबापांच्या रागाच्या बोलण्याप्रमाणें मित्रांच्या धमक्यांतहि कांहीं तरी मनाला खुलविणारें असतेंच. त्यामुळें असो अथवा बापुराव हा नुसता शनिवारीं शेंदूर लावणारा मारुतिभक्त नाहीं, चिंतामणराव जोश्यांच्या सोटाछाप गुंड्याभाऊचा वडील भाऊ शोभणारी ही वल्ली आहे ही माझ्या अनुभवाची गोष्ट असल्यामुळें असो, त्याच्या मोफतवाचनालयाच्या महोत्सवाचें निमंत्रण मीं तात्काळ स्वीकारलें.

बापुरावांच्या गांवीं जायला मी निघालों.

आगगाडीबरोबर माझें मनही धांवूं लागलें. पंचवीस वर्षांपूर्वींच्या गोष्टी डोळ्यांपुढें

उभ्या राहिल्या. कॉलेजमध्यें बापूचे नि माझे कडाक्याचे वाद व्हायचे. तो टिळकांचा केवढा भक्त होता ! मला लोकमान्यांविषयीं आदर असला तरी गोखल्यांची निंदा मुळींच आवडत नसे. रात्रीं दोन दोन वाजेपर्यंत न कळणाऱ्या राजकारणाविषयीं दोघांनीं भांडत बसायचें आणि मग शेवटीं चहाच्या मध्यस्थीनें समेट करून झोंपी जायचें असा त्यावेळचा आमचा क्रम असे. बापुरावाच्या गांवीं त्याच्या लग्नाकरतां त्यावेळीं मी एकदां गेलोंही होतों. त्यानंतर त्याचीं आग्रहाचीं निमंत्रणें आलीं, माझीं खात्रीचीं अभिवचनें गेलीं. पण माझें जाणें कांहीं केल्या घडलें नाहीं. आतां पुन्हां पंचवीस वर्षांनीं—

● ● ●

पंचवीस वर्षे ! काळपुरुषाच्या प्रवासमार्गावरले अवघे पंचवीस मैलांचे दगड ! पण मानवी आयुष्याच्या दृष्टीनें तब्बल एक पिढी ! माझें मन म्हणूं लागलें, बापुरावाचें गांव आपण पाहिल्याला दोन तपें झालीं. एका पिढीचें कर्तृत्व मध्यंतरींच्या काळांत खर्ची पडलें. बापुरावासारखा हौशी, कष्टाळु नि सुखवस्तु मनुष्य ज्या गांवाला लाभला आहे, तिथें आतां कितीतरी सुधारणा झाल्या असतील. आपल्याला त्याच्या गांवांतल्या बऱ्याचशा गोष्टींची ओळखसुद्धां पटणार नाहीं आतां. पण—

गांवाच्या सीमेवरलें तें जुनाट मारुतीचें देऊळ मी ओळखलें. पंचवीस वर्षांपूर्वी तें नीट उभें होतें. आतां त्याची एक बाजू कलल्यासारखी दिसत होती. बाकी कुठलाही फरक झाला नव्हता त्याच्यांत. मी बापुरावाबरोबर त्याच्या घरीं जातांना गांवाचें जें दर्शन घेतलें, त्यानें माझें मन सुन्न होऊन गेलें. जणुं कांहीं हें गाव मध्यंतरीं पंचवीस वर्षे झोंपींच गेलें होतें. आणि त्यामुळें त्याच्यांत म्हणण्यासारखा कुठलाच बदल झाला नव्हता ! कुठें एखाद्या मारवाड्याच्या घरावर मजला चढला असेल, कुठें कौलारू छपरांच्या जागीं मंगळोरी कौलांनीं नटलेलीं छपरें दिसूं लागलीं असतील, कुठें एखादा बोळ अधिक रुंद झाला असेल ! पण—

रस्त्यामें भटकणाऱ्या उघड्या नागड्या मुलांचे थवे पूर्वीसारखेच सर्वत्र दिसत होते, घरांना सरसकट सुतकी कळा आल्याचा भास होत होता, एखाद्या खोडकर मुलानें सुंदर चित्राचे कात्रीनें वेडेवाकडे तुकडे करावेत त्याप्रमाणें त्या गांवांतल्या जीवनाचे दुर्दैवानें तुकडे तुकडे केले असावेत असें वाटत होतें. एक

पिढी लोटली होती. पण गांवातली घाण, गांवांतलें दारिद्र्य, गांवांतलें अज्ञान यांना गांवाबाहेर लोटून देण्याचें काम मात्र जसेंच्या तसेंच पडून राहिलें होतें.

संध्याकाळीं बापुरावानें चालविलेल्या मोफत वाचनालयाचा रौप्यमहोत्सव साजरा झाला. 'आपल्या देशांत व्यक्तीप्रमाणें संस्थेचेंहि सरासरी आयुष्य फार कमी असतें म्हणून अशा उत्सवाचें फार महत्त्व आहे' अशा अर्थाचें कांहीं तरी मी आरंभींच्या माझ्या भाषणांत बोललों. गांवातल्या अनेक मंडळींनीं बापुरावांचें अभिनंदन केलें. त्याला हार घातले. त्या वाचनालयाकरतां त्यानें पदराला बराच खार लावून घेतला होता, यांत संशय नव्हता. पण व्यक्तिशः त्याचें अभिनंदन करतांना–माझ्या जिवलग बालमित्राचें अभिनंदन करतांना–माझी जीभ अडखळूं लागली. त्याच्या अभिनंदनाचे शब्द जिभेवर येतात न येतात तोंच डोळ्यांपुढें सकाळीं पाहिलेलीं गांवातलीं तीं सारीं करुण दृश्यें उभीं राहूं लागलीं.

त्यांतलें प्रत्येक दृश्य म्हणत होतें—बापुराव गेलीं पंचवीस वर्षें इथेंच राहत आहे. तो हौशी आहे. कष्टाळु आहे, सुखवस्तु आहे. पण—

चुकून फांशीं गेलेल्या मनुष्याचें भूत न्यायाधीशासमोर उभें रहावें आणि त्यानें आपली कहाणी सांगायला सुरवात करावी तसें त्या दृश्यांकडे पाहून मला वाटूं लागलें. माझे अभिनंदनाचे शब्द ओठांतल्या ओठांत विरून गेले.

• • •

घरीं परत येतांना आगगाडीबरोबर माझें मनही धावूं लागलें, पण आतां तें भूतकाळाकडे धांव घ्यायला तयार होईना. मध्यंतरीं पंचवीस वर्षें लोटलीं होतीं. पण बापूचा गांव जिथल्या तिथेंच होता. त्याच्या गांवासारखीं हजारों खेडीं चिखलांत रुतून बसलेल्या गाड्याप्रमाणें दारिद्र्यांत आणि अज्ञानांत पूर्वींसारखींच, छेः अधिक अधिक खोल, गाडलीं जात होतीं. या काळांत जगांत दोन महायुद्धें झालीं. पण बापूच्या गांवांत—त्या गांवासारख्या लक्षावधि खेड्यांत—या महायुद्धामुळे झालेल्या महागाईखेरीज दुसरा कुठलाहि महत्त्वाचा बदल अद्यापि झाला नव्हता.

असें कां व्हावें? मोफत वाचनालय चालविणाऱ्या बापूचा उत्साह काय कमी आहे? सार्वजनिक कार्याची त्याला आवड नाहीं असें कोण म्हणेल?

आठ वर्षापूर्वी सावरकर एका सहभोजनाकरतां शिरोड्यास आले होते. बोलतां बोलतां ते मला म्हणाले होते, 'तुमच्या पिढींतल्या अनेकांची कार्यक्षेत्रें चुकलीं. आज वाङ्मयांत चमकणारी कितीतरी मंडळी राजकारणांत चमकायला हवी होती!'

सावरकरांच्या या उद्गारांतलें कटुसत्य बापूच्या गांवाहून परत येतांना मी तीव्रतेनें अनुभवीत होतों. बापूसारखी माझ्या पिढींतली कितीतरी मंडळी मी नेहमीं पाहतों. कुणाचें केस पांढरे झाले आहेत, कुणाला टक्कल पडूं लागलें आहे, कुणी मुलीचें लग्न जुळविण्याच्या गडबडींत आहे. ह्या साऱ्या गोष्टी निसर्गक्रमाला धरूनच आहेत. पण ही मंडळी भेटली आणि शाळाकॉलेजांतल्या आठवणी सुरू झाल्या म्हणजे एकेकांचे त्यावेळचे जहाल उद्गार मला आठवतात आणि मी मनांतल्या मनांत म्हणतों—ते उत्कट उद्गार काढणाऱ्या या सर्वांचें देशप्रेम कुठें गेलें? ते काय निव्वळ नाटकी उद्गार होते?

माझ्या या प्रश्नाचें उत्तर बापूच्या मोफत वाचनालयांत रौप्यमहोत्सवानें मला दिलें. बापूचें सारें कर्तृत्व तें वाचनालय चालविण्यांत खर्चीं पडलें होतें. न कळत तारुण्यांतच त्याचें कार्यक्षेत्र सकुंचित झालें होतें. आपल्या लढाऊपणाला आणि जिवंत देशभक्तीला अवसर मिळेल अशा क्षेत्रांत त्यानें कधीं पाऊलच टाकलें नाहीं. शत्रूंशीं लढण्याकरतां ज्या तलवारीचा उपयोग करायचा तिची विळी करून भाजी चिरीत बसण्यासारखा हा प्रकार आमच्या पिढींतल्या अनेक सुबुद्ध तरुणांच्या हातून घडला. परतंत्र देशांत राजकारण हाच तरुणांचा एकमेव धर्म झाला पाहिजे हें आम्ही विसरलों. राजकारणाकडे दुर्लक्ष करून लहान मोठ्या समाजसेवेकडे वळणारीं माणसें प्रामाणिक असतात. पण निर्जल प्रदेशांत बाग फुलवूं पाहण्यासारखे त्यांचे प्रयत्न होतात, याची आम्हांला कधीं कल्पनाच आली नाहीं!



गाडींत पलीकडे बसलेले चारपांच तरुण जोरजोरानें वाद करीत होते! आपल्या देशाची प्रगति कशानें होईल, गांधीवादानें कीं समाजवादानें, हा त्यांच्या वादाचा विषय होता.

मला बापूची व माझ्या जाग्रणें करून केलेल्या राजकारणाच्या वादाची आठवण झाली.

माझ्या मनांत आलें, क्षणभर त्या तरुणांना थांबवावें आणि म्हणावें, ' कांहीं गांधीवादी व्हा किंवा समाजवादी व्हा. पण दोन्हीपैकीं कांहींतरी व्हा! अगदीं उत्कट श्रद्धेनें कुठल्याही राजकीय तत्त्वज्ञानाचा स्वीकार करा. हो. आणखी एक लक्षांत ठेवा, वाचनालय ही चांगली गोष्ट आहे. पण तुम्ही मात्र मोफत वाचनालय काढूं नका!'

● ● ●

# माकडाची स्मशानयात्रा ३

मधें मुंबईला दारूबंदी झाली तेव्हां आपली तलफ भागविण्याकरितां मदिरेचे एकनिष्ठ उपासक स्पिरिटच्या बाटल्या तोंडाला लावीत असत म्हणे! वर्तमानपत्रांतल्या कांहीं कांहीं विचित्र बातम्या वाचतांना मला या गोष्टीची नेहमीं आठवण होते. मी मनांत म्हणतों, कांही तरी अद्भुत किंवा चमत्कारिक वाचायला मिळालें कीं वाचकाचा वाचनाचा कैफ भागूं शकतो अशी तर या बातम्या देणारांची समजूत नसते ना?

परवां सहज वाचलेली हीच बातमी पहाना! अमरावतीची गोष्ट आहे ही! तिथें एक लाल तोंडाचें माकड रस्त्यानें जाणारायेणारांना फार त्रास देई! बाजारांतही तें धमाल उडवून देऊं लागलें. त्याला पकडण्याकरतां बक्षिस लावण्यापर्यंत पाळी आली. शेवटीं त्या माकडाला कुणीतरी मारलें. झालें, लगेच त्या माकडाची स्मशानयात्रा निघाली. त्या स्मशानयात्रेला खूप गर्दी लोटली होती, असेंही त्या बातमीदारानें शेवटीं लिहिलें होतें.

हें वाचतां वाचतां माझ्या मनांत आलें—बातमी तर मोठी फक्कड आहे. फक्त दोनच गोष्टींची उणीव आहे तिच्यांत! एक त्या कैलासवासी (माकडें हीं रामभक्त असल्यामुळें त्यांना वैकुंठवासी म्हणणें अधिक योग्य होईल काय? संस्कृति-संरक्षकांनीं विचार करावा.) माकडाचा फोटो आणि दुसरी असल्या बातम्यांच्या शेवटीं आवश्यक असलेली सदिच्छा—' ईश्वर मृताच्या आत्म्यास शांति देवो!'

अरे हो ! आणखी एक गोष्ट विसरलोंच कीं ! काळ्या रेघांची चौकट हवी होती या बातमीभोंवतीं !

मला मोठें नवल वाटलें त्या बातमीदाराचें ! सबंध हिंदुस्थानांत फक्त अमरावतीलाच एक लाल तोंडाचें माकड असतें तर गोष्ट निराळी होती. पण या अठराशें मैल रुंद आणि एकोणीसशें मैल लांब देशांत गांवोगांव अशीं माकडें आहेत. त्यांची लोकसंख्या एकसारखी वाढतच आहे. हिंदुस्थानांत माकडांचेंच राज्य आहे असें कुणीं थट्टेनें म्हटलें तरी चालेल, इतका या लाल तोंडाच्या प्राण्याचा ठिकठिकाणीं सुळसुळाट आढळतो ! हिंदुस्थान हा सर्पांचा देश आहे असें लंडन किंवा न्यूयार्कमध्यें बसून हिंदुस्थानविषयीं पुस्तकें खरडणारे गोरे लेखक खुशाल म्हणोत ! प्राचीनकाळीं हा नागांचा देश होता हें इतिहाससुद्धां कबूल करतो. पण आज मात्र तो त्या कृष्ण नागांचा देश राहिला नसून लाल तोंडाच्या माकडांचा देश होऊन बसला आहे ! बिचारे नाग फणा खालीं करून आतां गारुड्याच्या टोपल्यांत नाहींतर रानावनांतल्या बिळांत लपून बसले आहेत ! आणि माकडें मात्र अमरावतीसारख्या मोठमोठ्या शहरांतूनसुद्धां तैमुरलंगाप्रमाणें लोकांना राजरोज उपद्रव देत ऐटींत मिरवीत आहेत !

अशा स्थितींत एका माकडाचा मृत्युलेख छापण्यांत अमरावतीच्या त्या बातमीदारानें विशेष असें काय साधलें? माकडें अतिशय निरुपद्रवी असतात. रावणासारख्या जुलमी राक्षसाविरुद्ध होणाऱ्या लढ्यांत मोठ्या आनंदानें तीं भाग घेतात, असल्या कांहीं जुन्या पुराण्या कल्पना त्या बातमीदाराच्या मनांत घोळत असतांनाच त्याच्या दृष्टीला तें माकड पडलें असेल काय ? अखिल मर्कटजातीविषयीं त्यानें मनामध्यें बाळगलेल्या या पूज्य भावनेला अमरावतीच्या या विशिष्ट माकडाच्या चेष्टांनीं धक्का बसून त्याला मोठें दुःख झालें असेल का ! त्या दुःखामुळें या मर्कटाच्या पुढच्या लीलांविषयीं एकप्रकारचें विकृत कुतूहल त्याच्या मनांत उत्पन्न झालें असेल काय ? आणि त्या कुतूहलाचा कळस म्हणून त्या माकडाच्या मृत्यूची बातमी देण्याचा मोह त्याला अगदीं अनावर झाला असेल—

या विविध प्रश्नांचीं उत्तरें मानशास्त्रज्ञाशिवाय कोण देऊं शकेल ?

मात्र माकडें सज्जन असतात, तीं रानावनांतल्या फळांवर उपजीविका करून राक्षसांविरुद्ध लढण्याइतकी सात्त्विक असतात वगैरे वगैरे समजुती उराशीं अखंड बाळगल्यामुळें त्या बातमीदाराला अमरावतींतल्या मर्कटलीला पाहून जर धक्का बसला

असेल तर त्याचा सारा दोष त्याच्याकडेच आहे. त्यानें माकडापासून अपेक्षिलेले गुण त्या जातींत एकावेळीं होते हें खरें! पण तो काळ आतां आहे कुठें! रामराज्यांत माकडें सज्जन होतीं. यथा राजा तथा प्रजा हें कदाचित् त्याचें कारण असूं शकेल! पण आतां सज्जनांच्या स्वप्नसृष्टीशिवाय रामराज्याला जगांत दुसरीकडे कुठें जागा आहे?

आणि आधुनिक दृष्टीनें पाहिलें तर रामराज्यांत भित्रेपणाखेरीज दुसरें काय आढळतें? एक परीट सीतेविरुद्ध कांहींतरी कुजबुजला तर रामानें लगेच आपल्या प्रिय पत्नीचा त्याग केला! पण महर्षि रानड्यांपासून महात्मा गांधीपर्यंत असंख्य मोठमोठीं माणसें जें उघड उघड बोलत आलीं आहेत, त्यांच्याकडे कुठल्यातरी ग्लॅडस्टननें किंवा चर्चिलनें कधीं फारसें लक्ष दिलें आहे का? सीतेचा त्याग केल्यानंतर रामानें मोठा अश्वमेध यज्ञ केला. यज्ञ यथासांग करायचा म्हणजे यजमानाच्या जोडीनें बसायला त्याची बायको हवी! बिचारा राम मोठ्या पंचाइतींत पडला. तो विसाव्या शतकांत निदान एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस जन्मला असता तर बौद्धिक भुकेचा आधार घेऊन लगेच एखाद्या एम्. ए. पीएच. डी. विदुषीबरोबर त्याला बोहल्यावर चढतां आलें असतें आणि मग यज्ञाचें पुण्यही त्याच्या पदरांत पडलें असतें! पण राम तेवढा भाग्यवान होता कुठें? त्याच्या अडाणी राज्यांत 'बौद्धिक भुके' सारख्या सुसंस्कृत गोष्टी असणार कुठून? रामानें मुकाट्यानें सीतेच्या आकाराची सोन्याची पुतळी केली आणि तिला डाव्या बाजूला बसवून यज्ञकर्म पार पाडलें. रामाच्या काळांत आणि आजच्या काळांत अंतर आहे तें हेंच! त्यावेळीं माणसांचे हुबेहूब पुतळे करण्याइतकें सोनें होतें! पण बौद्धिक भूक? छेः! एकालासुद्धां ती कधीं चरचरून लागल्याचा दाखला नाहीं इतिहासांत!

दोन काळांतलें हें अंतर विसरल्यामुळेंच अमरावतीच्या बातमीदाराची त्या माकडाच्या बाबतींत थोडी गफलत झाली असावी! कदाचित् सीतेनें दिलेला रत्नहार मारुतीनें फेंकून दिल्याची गोष्टही हें माकड पाहात असतांना त्याच्या मनांत घोळत असेल! 'ज्या रत्नांत राम दिसत नाहीं तीं रत्नें आणि शुद्ध दगड माझ्या दृष्टीनं सारखेच आहेत' असें मारुतीनें सीतेला सांगितलें होतें. आपल्या गांवांतलें हें माकडही ती पवित्र परंपरा पाळीत असेल अशा आशेनें हा बातमीदार त्याच्याकडे पाहूं लागला असेल. पण एक गोष्ट तो अजिबात विसरला. अलीकडे मांकडेंसुद्धां खूप सुधारलीं आहेत! 'आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला' हें काव्य आमच्या

या विद्वान् बातमीदाराच्या कानावर अद्यापहि पडलें नाहीं काय ? ही निःसंशय विसाव्या शतकांतली सुधारणा आहे. त्रेतायुगांतल्या माकडांना मद्य हा शब्दसुद्धां कदाचित् माहीत नसेल.

एकदां एका माकडाला कुणी रत्नहार अर्पण केला, तेव्हां त्यानें तो पहिल्यांदा चाटून पाहिला, नंतर त्याचा वास घेतला, शेवटीं तो चावून बघितला आणि मग मान हालवून झटपट त्याची गुंडाळी करून स्वारी त्या आसनावर एकदम विराजमान झाली, असें माकडाचें वर्णनहि एका जुनाट कवीनें केलें आहे हें खरें पण त्या कवीबरोबरच तो काळ निघून गेला. माकडें आतां मागासलेलीं राहिलीं नाहींत. भांडवलशाही, साम्राज्यशाही आणि हुकूमशाही यांचें बाळकडू त्यांनाहि पिढ्यान्-पिढ्या मिळूं लागलें आहे. भोळ्या लोकांकडून जें अनायासें मिळेल तें पदरांत पाडून घ्यायचें आणि जें मिळणार नाहीं तें नखांची भीति दाखवून काढून घ्यायचें या गेल्या दोन तीन शतकांतल्या मानवी नीतींत माकडेंसुद्धां आतां पारंगत झालीं आहेत. उद्यां जर त्यांना वाचा फुटली तर ' आम्ही तुमचे पूर्वज नाहीं, वंशज आहोंत ' असें म्हणतच तीं तुमच्या आमच्या गळ्यांत पडूं लागतील.

या साऱ्या उघड उघड गोष्टी अमरावतीच्या त्या विज्ञान् बातमीदाराला काय कळत नसतील ? न कळायला काय झालें ? हल्लींच्या युगांत अनेक वर्तमानपत्रें संपादकांच्या बुद्धीपेक्षां बातमीदारांच्या कल्पकतेवर चालतात म्हणे ! आणि युद्धाच्या कथा आपल्याला रम्य वाटतात त्या कुणामुळें ? बातमीदारांच्या बुद्धि-विलासामुळेंच ना ? मग ती माकडाची बातमी देण्यांत अमरावतीच्या या बातमीदाराचा कांहीं विशेष उद्देश असलाच पाहिजे ! नाहीं का ?

मी पुन्हां ती बातमी वाचली. एकदम माझ्या डोक्यांत लख्खकन् प्रकाश पडला. तात्पर्य न दिलेल्या इसापच्या एखाद्या गोष्टीचा आपण कांहींतरी भलताच अर्थ करावा तशी माझी स्थिति झाली. अमरावतीच्या त्या चतुर बातमीदाराचा हेतु चावट चमत्कृति किंवा क्षणिक गंमत निर्माण करण्याचा नव्हता ! हिंदी राष्ट्राच्या प्रगतीला ही बातमी पोषक आहे म्हणूनच त्यानें आपली लेखणी उचलली आणि इतका महाग झालेला पांढरा कागद खर्च केला !

हिंदु समाज अजून फार भाबडा, फार सात्त्विक, फार देवभोळा आहे. माकडाला मारणें हें आपल्यांत पाप समजतात. कुणीतरी शूर मनुष्यानें चारदोन शतकांपूर्वीं

तरवार गाजविलेली असावी आणि त्यानें पराक्रमानें मिळविलेल्या संपत्तीच्या राशीवर बसून त्याच्या आजच्या मूर्ख वंशजांनीं आपली चैन चालवावी, तसा माकडांच्या बाबतींत आपल्या देशांत प्रकार झाला आहे. साऱ्या जगाच्या इतिहासांत मारुति हीच काय ती एकुलती एक पूज्य व्यक्ति या जातींत जन्माला आली. पण मारुतीच्या या महात्म्यावर गेलीं हजारों वर्षें माकडांच्या टोळयांच्या टोळ्या आपल्या देशांत लोकांना उपद्रव देत राहिल्या आहेत. घरांचीं कौलें फोडावींत, बागेंतलीं फुलझाडें उध्वस्त करावींत, फळझाडांचा निकाल लावावा, प्रसंगीं लहान पोरांना ओचकरावें, काय वाटेल ते अत्याचार त्यांनीं करावेत ! आम्ही हिंदु लोक फक्त रॉकेलचे रिकामे डबे घेऊन ते जोराने वाजवीत माकडांच्या या टोळक्यांना पिटाळून लावण्याचा प्रयत्न करणार ! पण या सुधारलेल्या माकडांना रिकाम्या डब्यांचा पोकळ आवाज आणि बंदुकीचा भरींव आवाज यांतलें अंतर कळूं लागलेलें असतें. कुठलेंहि सरकार अर्जविनंत्यांच्या राजकारणाला जेवढी किंमत देतें तेवढीच हीं माकडें रिकाम्या डब्यांच्या आवाजाला देतात ! पण असें असून सुद्धां माकडाला मारलें कीं पाप लागतें या समजुतीमुळें त्याला मारायला सहसा कुणी तयार होत नाहीं. सारे लोक चडफडत या मूर्ख प्राण्याचा जुलूम सोशीत असतात.

परवां अमरावतींत या परंपरागत दुबळेपणाला रजा देण्यांत आली. कुणीतरी एक मनुष्य अत्यंत आवश्यक अशी माकड मारण्याची गोष्ट करायला तयार झाला, आपल्याला असह्य उपद्रव देणाऱ्या प्राण्याच्या हत्त्येंत पाप नसून असलें तर पुण्यच आहे अशी नवीन श्रद्धा बाळगणारी एक तरी व्यक्ति एवढ्या मोठ्या गांवांत निघाली. या गोष्टीचें कौतुक करण्याकरतांच त्या बातमीदारानें ही बाह्यतः गमतीची वाटणारी बातमी दिली असली पाहिजे.

पूजेच्या आणि भक्तिच्या अनेक जुन्या कल्पना आपण आतां सोडून दिल्या पाहिजेत हें या चतुर बातमीदारानें सूचित केलेलें सत्य आतां कोण अमान्य करील ? जुने संकेत–मग ते सामाजिक असोत, धार्मिक असोत, आर्थिक असोत अथवा वाङ्मयविषयक असोत–त्या काळच्या विशिष्ट परिस्थितींतून आणि त्या काळच्या माणसांच्या विशिष्ट गरजांतून निर्माण झालेले असतात. तो काळ संपल्यावरहि ते संकेत पाळीत सुटणें म्हणजे मसाला भरून प्रेतें अमर करण्याची धडपड करण्यासारखेंच नाहीं का ?

नव्या काळाबरोबर नवे संकेत रूढ व्हायलाच हवेत. माकडाला मारणें हा आपल्या समाजाच्या दृष्टीनें असाच एक नवा संकेत असल्यामुळें त्याचें स्वागत करण्याकरतांच त्या बातमीदारानें या विलक्षण स्मशानयात्रेची बातमी मुद्दाम दिली असावी ! त्या स्मशानयात्रेला गर्दी लोटली होती यांत कांहींच नवल नाहीं. हिंदु समाजाची संस्कृति स्वभावतःच उदार आहे. वैर करायचें झालें तरी तें मरणाच्या क्षणार्धात करावें, त्यानंतर नाहीं, अशीच आपल्या संस्कृतिची शिकवण आहे !

त्या खोडकर माकडाची स्मशानयात्रा अमरावतींत निघाली व ती पार पडल्यानंतर चार दिवसांनीं ही बातमी मला वाचायला मिळाली याला माझा इलाज नाहीं. पण ही गोष्ट कोल्हापुरांत घडली असती तर मी सुद्धां त्या अभूतपूर्व अंत्ययात्रेच्या गर्दींत सामील झाल्याशिवाय राहिलों नसतों. 'जुने संकेत अंधेपणाने पाळूं नका. धर्माच्या किंवा दुसऱ्या कुठल्याही नांवाखालीं जुलूम सोसूं नका, आपल्याला उपद्रव देणारांची पूजा करीत बसण्याचा मूर्खपणा यापुढें करूं नका,' असाच त्या स्मशानयात्रेचा संदेश नाहीं काय ?

● ● ●

# एक भास ४

चाळिशी उलटण्यापूर्वी मनुष्य मूर्ख असतो आणि ती उलटली कीं तो दुष्ट होतो असें शॉने म्हटलें आहे. या उक्तींत विलक्षण मर्मभेदकपणा असला तरी मला ती कधीच खरी वाटली नाहीं. चाळिशीच्या नदीनें माणसाच्या आयुष्याचे दोन भिन्न भाग केले आहेत हें मला मान्य आहे. पण मला नेहमींच वाटतें—मनुष्य चाळीस वर्षांचा होईपर्यंत आशावादी असतो आणि पन्नाशीबरोबरच निराशेची झुळुकही त्याच्या जीवनांत प्रवेश करते ! आतां यावर आशा हें मूर्खपणाचें दुसरें काव्यमय नांव आहे आणि निराशा हें दुष्टपणाचें दुसरें सभ्य नांव आहे असें शॉ म्हणूं शकेल ही गोष्ट निराळी !

परवां एका पेन्शनराशीं सहज गप्पागोष्टी करण्याचा प्रसंग आला तेव्हां पन्नाशी

उलटली कीं मनुष्य जीवनाविषयीं कसा अश्रद्ध होत जातो हा अनुभव मीं अत्यंत तीव्रतेनें घेतला. यंदाच एम. ए. झालेल्या एका विद्यार्थ्याविषयीं आम्ही बोलत होतों. ‘ हा आता काय करणार आहे ? ’ पेन्शनर महाशयांनीं मला प्रश्न केला. ‘ मुंबईला नोकरीकरतां जाणार आहे. घरीं चारपांच धाकटीं भावंडं आहत. त्यांच्या शिक्षणाची जबाबदारी याच्यावरच आहे !

पेन्शनर कांहीं बोलले नाहींत. नुसते हंसले मात्र ! पण हिरवळीने झांकलेल्या एखाद्या बिळांतून बोटभर रुंदीच्या जिवाणूनें हळूंच डोकें वर काढावें त्याप्रमाणें त्यांच्या हंसण्यांतून एक प्रकारचा सूक्ष्म तिरस्कार मला प्रतीत झाला ! मला मोठें आश्चर्य वाटलें त्यांच्या या वृत्तीचें ! उपहास करण्यासारखे त्या विद्यार्थ्याविषयीं मी काय बोललों होतों ?

थोडा वेळ थांबून पेन्शनरसाहेब मला म्हणाले, ‘ कवि आहांत झालं ! ’

कवि हा शब्द प्राचीन काळीं द्रष्टा या अर्थानें वापरला जात असला तरी आधुनिक जीवनकोशांत त्याला फक्त एकच अर्थ आहे हे मलाही ठाऊक आहे. आधुनिक व्यवहार म्हणतो—कवि म्हणजे मूर्ख मनुष्य ! पण त्या मुलाविषयीं मी जें बोललों होतों त्यांत या व्यवहारचतुर पेन्शनरांनीं टीका करावी असें कुठलें स्वप्नाळु काव्य भरलें होतें, तें मला कांहीं केल्या कळेना !

एकदोन मिनिटें माझ्या बावरलेल्या मनःस्थितीचा आनंद उपभोगून शेवटीं ते म्हणाले, ‘ अहो, या पोराला मुंबईला नोकरी लागल्यावर हा आपल्या भावंडांना थोडाच विचारणार आहे ! आपल्या जिवाची मुंबई करील तो ! पण पोटाला चिमटा घेऊन किंवा चैनीचा मोह दूर झुगारून हा आपल्या भावांबहिणींना मदत करील याच्यावर क्षणभर सुद्धां विश्वास बसणार नाहीं माझा ! ’

लगेच त्यांनीं आपले निरनिराळे अनुभव सांगायला सुरवात केली. एका बड्या पगाराच्या माणसाची सुशिक्षित पत्नी नवऱ्याच्या आवडीनिवडींची पर्वा न करतां त्याची खाणावळीतल्या डब्यावरच कशी संभावना करते, जवळ असलें नसलेलें विकून बापानें ज्याचें शिक्षण केलें होतें अशा गरीब कुटुंबांतल्या एका वडील मुलानें आईबाप आणि धाकटीं भावंडें यांना घरांतून सन्मानपूर्वक कसें हांकलून दिलें, एका सुखवस्तु कुटुंबांतला एक वडील भाऊ पुण्याच्या एका हॉटेलांत मृत्युशय्येवर पडला असतांना गांवांत असूनही धाकटा भाऊ त्याची चौकशी करायला सुद्धां कसा गेला

नाहीं, एक ना दोन, असलीं दहा उदाहरणें त्यांनीं मला सविस्तर वर्णन करून सांगितलीं. या उदाहरणांतला प्रत्येक प्रसंग मोहनलाल दवे या चित्रपटकथा-लेखकाचा कथाविषय होण्याला अगदीं लायक होता!

ज्याला आपण कौटुंबिक प्रेम म्हणतों तें आतां फक्त कविकल्पनेंतच उरलें आहे एवढें सुचवूनच ते थांबले नाहींत. त्यांनीं मग आपली दृष्टि सामाजिक गोष्टींकडे वळविली! अमक्या मोठ्या माणसाचा स्त्रीलंपटपणा, तमक्या पुढाऱ्याचा फंडगुंड-पणा–ते सांगत असलेल्या गोष्टी सर्वस्वीं खोट्या नव्हत्या. यापूर्वींच मीं त्या ऐकलेल्या होत्या, कांहींच्या बाबतींत तर ऐकीव माहितीपेक्षां अधिक महत्त्वाचा असा पुरावाही माझ्या संग्रहीं होता.

त्या पेन्शनरांनीं पांच दहा मिनिटेंच या विचित्र विषयावर वक्तव्य केलें असेल! पण ते निघून गेल्यावर कितीतरी वेळ मी उदास होऊन बसलों होतों. माझें मन राहून राहून म्हणत होतें—प्रेम, त्याग, संयम, प्रामाणिकपणा इत्यादि गोष्टी या जगांत आढळतात! पण त्या क्वचित्! प्रतिभेप्रमाणें हजारांतल्या एखाद्यालाच असल्या एखाद्या गुणाची देणगी निसर्ग देतो. पण हे गुण कांहीं शिक्षणानें निर्माण होत नाहींत. आजची मानवता या सद्गुणांकडे पाठ फिरवून व्यक्तिसुखाच्या आणि त्यांतही शरीरसुखाच्या मागें धांवत सुटली आहे. कोमल काव्य हाच सुखी आयुष्याचा आत्मा मानून वागणारे सध्यांच्या जगांत जन्मभर दुःखें भोगत राहतात. उलट क्रूर व्यवहाराच्या पायावर जीवन–मंदिर उभारणारे त्या मंदिरांतल्या भव्य महालांत अनेक विलासांत मग्न होऊन जातात.

माझें दुसरें मन म्हणूं लागलें—मनुष्य हा अजूनही पशूचा अगदीं जवळचा नातलग आहे, त्याचें देवाशीं नातें असलेंच तर तें फार दूरचें आहे, इत्यादि त्या गृहस्थांनीं सुनावलेले सिद्धांत सत्य मानून आपण उगीच विषण्ण झालों आहों. मानवी मनाला काळी बाजू आहे यांत शंकाच नाहीं. पण त्याची एक बाजू जितकी काळीकुट्ट आहे तितकीच दुसरी उज्ज्वल आहे. एका यःकश्चित् कपोताचे प्राण वांचविण्या-करतां शिबिराजानें आपलें मांस कापून दिलें ही कथा कदाचित् एखाद्या प्रतिभा-शाली ऋषीची कविकल्पना असेल! पण दासबाबूंनीं देशासाठीं लक्षावधि रुपयांच्या मिळकतीवर एका क्षणांत पाणी—आणि तेंहि आनंदाश्रूंचें—सोडलें ही गोष्ट तर लोकांनीं डोळ्यांनीं पाहिली आहे ना? वानप्रस्थाश्रम स्वीकारणारा याज्ञवल्क्य

आपली पत्नी मैत्रेयी हिला आपल्या मालकीची सर्व मिळकत देऊं लागला तेव्हां तिनें ' या संपत्तीनं माझ्या आत्म्याचा उद्धार होईल का ? ' असा जो विलक्षण पण विचारप्रवर्तक प्रश्न त्याला विचारला तो ऐकणाऱ्या वृक्षवेली आज विद्यमान नाहींत ! पण देशाच्या स्वातंत्र्यसंग्रामांत हांसत उडी घेणाऱ्या जवाहरलालाच्या पावलावर पाऊल टाकून जाण्याची आपली इच्छा कमलादेवींनीं कोणत्या शब्दांनी व्यक्त केली असेल हें अलाहाबादच्या स्वराज्यभुवनाच्या भिंतीसुद्धां आज कुणालाहि सांगूं शकतील.

मनाचा उदासपणा घालविण्याकरितां सर्व उदाहरणें मी आठवूं लागलों. त्यांनीं क्षणभर माझें समाधान झालें. पण लगेच माझ्या लक्षांत आलें—आपण आपली फसवणूक करून घेत आहों. असलीं उज्ज्वल उदाहरणें हे अपवाद आहेत. या जगांत बुद्ध आणि ख्रिस्त एक एकदांच होऊन गेले. पण सिकंदर, तैमूरलंग, नेपोलियन आणि हिटलर यांची परंपरा मात्र अखंड चालू राहिली आहे. मानवी जीवनाच्या खाणींत सोन्याचे कण अजून फार थोडे सांपडतात. बाकी सर्व माती ! पहावें तिकडे माती !

माणसाचें डोकें दुखत असलें तर दुसऱ्याला त्याला होणाऱ्या त्रासाची कांहींच कल्पना येत नाहीं. पण तो स्वतः मात्र अगदीं बेचैन होऊन गेलेला असतो. त्याचीं तात्त्विक दुःखेंहि अशींच असतात.

तो सारा दिवस मी एकसारखा अस्वस्थ होतों. दुपारीं अगदीं साध्या गोष्टी-साठीं मी बायकोवर एकदम चिडलों ! शाळा सुटून मुलें घरीं आल्यावर ' दंगा काय करतां ? ' म्हणून मीं गस्त घालणाऱ्या पोलिसांच्या आवाजांत त्यांना दरडावलें. शेवटीं माझी एक आवडती कादंबरी घेऊन ती वाचायला मीं सुरवात केली. पण पाऊस पडल्यावर हपूस आंबासुद्धां जसा बेचव लागूं लागतो, तशी अस्वस्थ मनःस्थितीमुळें मला ती कादंबरी नीरस वाटूं लागली माझें तें आवडतें पुस्तक दूर फेंकून देऊन मी घराबाहेर पडलों.

दूर दूर—अगदीं पूर्ण एकांत असलेल्या एका जागीं जाऊन बसलों मी ! या जागीं येऊन बसलें कीं माझें मन नेहमीं प्रसन्न होत असे. पण आज मात्र—आज कांहीं केल्या तें ताळ्यावर येईना. इथें बसलें कीं समोरच्या गुलमोहोराच्या तांबड्या फुलांकडे पाहून यौवनांतल्या स्वप्नाळू प्रीतीचीं प्रतिबिंबें आहेत अशी कल्पना

माझ्या मनांत नेहमीं येऊन जायची. पण आज तीं फुलें हे फसविल्या गेलेल्या प्रीतीचे रक्ताचे अश्रु आहेत असें मला वाटूं लागलें. सभोंवारच्या वडांच्या लोंबणाऱ्या पारंब्या हे खेळकर बालकांचे झोले वाटत मला नेहमीं ! पण आज माणसाची गळफास लावून घ्यायची सोय व्हावी म्हणूनच निसर्गानें वडाच्या झाडांना इतक्या लांब लांब पारंब्या दिल्या असाव्यात अशी विचित्र कल्पना प्रथमच माझ्या मनांत आली.

हळुहळू अंधार पडूं लागला आकाशांत एक एक चांदणी उगवूं लागली. हें मोहक दृश्य पाहून दर वेळीं मला एखादी सुंदर कल्पना सुचे ! पण सकाळपासून जग आणि जीवन यांच्याविषयीं जी विच्त्रि अश्रद्धा माझ्या मनांत निर्माण झाली होती तिचें आणि सौंदर्याचें जन्मतःच वांकडें असावें ! हळुहळू पसरूं लागलेला अंधार आणि वर चमकणाऱ्या चांदण्या पाहून माझ्या मनांत आलें—जगांतल्या आसन्नमरण झालेल्या मानवधर्माला खालीं काढून ठेवण्याकरितां कुणीतरी हें लांबलचक काळें कांबळें पसरीत आहे—आणि लवकरच त्या धर्माची जी प्रचंड प्रेतयात्रा निघणार आहे तिच्यावर उधळण्याकरितां आकाशाच्या विशाल परडींत भराभर फुलें गोळा केलीं जात आहेत.

ही कल्पना मनांत येतांच माझी मलाच भीति वाटूं लागली. अंधार दाटत चालला होता. पण कांहीं केल्या उठावें असें वाटेना मला ! किती वाजले हें पाहण्याकरतां मीं घडयाळाकडे दृष्टि वळविली. माळावरल्या त्या अंधुक प्रकाशांत साडेआठ वाजल्याचा भास होत होता.

अवघे साडेआठ ! अजून हा विचित्र दिवस संपायला साडेतीन तास आहेत ! अरे देवा !

आपलें घडयाळ बंद पडलें असावें असा मला संशय आला. मीं तें कानाशीं नेऊन पाहिलें. टिक्-टिक्-टिक् ! किती गोड नाजुक आवाज !

एकदम टिक्-टिक् थांबली. मीं क्षणभर घडयाळ कानाशीं नेऊन पाहिलें. त्याची चाल एकदम थांबली होती. जणु कांहीं भोवतालचा आणि माझ्या मनांतला अंधार पाहून त्याची हृदयक्रिया बंद पडली होती !

घडयाळाला किल्ली द्यायचीसुद्धां इच्छा होईना मला ! मी तसाच बसून राहिलों.

इतक्यांत समोरच्या काळोखांतून एक अंधुक विशाल आकृति माझ्या रोखानें जलद पावलें टाकीत येत असलेली दिसली. हां हां म्हणतां ती माझ्याजवळ—अगदीं जवळ—आली आणि ' प्रभो सच्चिदानंद ' असे उद्गार काढून माझ्याशेजारींच बसली. मी त्या मनुष्याकडे निरखून पाहूं लागलों. फार वृद्ध दिसत होता तो! त्याच्या तोंडावरल्या सुरकुत्या आणि अंगावरले फाटके कपडे यांच्यांत अधिक जीर्ण काय होतें हें सांगणें फार कठीण होतें. रंगूनचा बॉम्बहल्ला होऊन खूप दिवस झाले होते. नाहींतर त्यांतून जीव बचावून आलेला हा एक दुर्दैवी वृद्ध आहे अशीच मीं माझ्या मनाची समजूत करून घेतली असती! मी त्याच्याकडे निरखून पाहत आहें हें त्याच्या लक्षांत आलें असावें. तोही माझ्याकडे वळून पाहूं लागला.

अरे बापरे! त्याचे ते दोन्ही डोळे किती विचित्र दिसत होते! त्याच्या उजव्या डोळ्यांतून गंगाजळाप्रमाणें निर्मळ असे अश्रु ठिबकत असल्याचा भास झाला मला! पण त्याच्या दुसऱ्या डोळ्यांतून एखाद्या पवित्र यज्ञकुंडांतल्याप्रमाणें अग्निस्फुलिंग उडत असल्यासारखें वाटत होतें. त्याच्या हातांतल्या पडशीकडे पाहत मीं त्याला प्रश्न केला, ' कुठून आलांत आजोबा ? '

' कुठून ? ' एवढा एक शब्द उच्चारून तो डोकें खाजवूं लागला. म्हातारीं माणसें विसराळू होत जातात, त्यामुळें आपण कुठल्या गांवाहून आलों याचेंसुद्धां या वृद्धाला स्मरण राहिलें नाहीं, याचें मला नवल वाटलें नाहीं. त्याला आपल्या गांवाचें नांव आठवत नसावें असें पाहून मी म्हणालों, फार दमलेले दिसतां तुम्ही!

तो हंसून म्हणाला, ' छेः, उगीच मजेनं थांबलोंय् मी! तसा कधींच दमत नाहीं मी! दिवसाचे चोवीस तास आणि वर्षाचे बारा महिने मी चालतच असतों. अगदीं अखंड! क्षणाचीसुद्धां विश्रांति लागत नाहीं मला! '

विसराळूपणाप्रमाणें बढाईखोरपणाही वृद्धांत नेहमींच आढळतो! म्हणून त्याच्या या उद्गारांकडे विशेष लक्ष न देतां मी म्हणालों, ' कुठल्या यात्रेला चाललाय् आजोबा ? '

माझ्या ' आजोबा ' या संबोधनाचा त्याला विलक्षण राग आला असावा! बाकी आपण तरुण आहों हें दाखविण्याचें वेडच असतें म्हणा प्रत्येक माणसाला. चिडखोर आवाजानें तो म्हणाला, ' आजोबा आजोबा काय म्हणतोस मला ? तुझ्या

आजोबाचा आजोबा जेव्हां रांगत होता तेव्हांहि मी असाच दिसत होतों आणि तुझ्या नातवाचा नातू ज्यावेळीं काठी टेंकीत टेंकीत चालत असेल त्यावेळीं सुद्धां माझी सुरत अशीच राहणार आहे !

स्वारी वेड्याच्या इस्पितळांतून पळून तर आली नाहीं ना अशी शंका माझ्या मनांत आली. पण वेडयाशीं बोलतांना वेडयाच्याच कलानें घ्यावें लागतें. म्हणून मी म्हणालों, ' हें पहा—आजो—नाहीं, नाहीं चुकलों ! तुमचं नांव ठाऊक नाहीं मला, म्हणून भलतेच शब्द तोंडांत येतात ! '

' माझं नांव ? ' हे दोन शब्द उच्चारून तो असा कांही चमत्कारिक हंसला कीं, आपला एखादा जिवश्चकंटश्च बालमित्र फार दिवसांनीं आपल्याला भेटावा, त्यानें आपल्या पाठीवर थाप मारून ' कसं भावड्या ? ' असें म्हणावें आणि आपल्याला मात्र त्याचें नांव सुद्धां आठवूं नये ! अगदीं तस्सें झालें मला आतां !

मनाचा हा गोंधळ लपविण्याकरितां मीं त्याला विचारलें ' किती दिवस झाले तुमच्या या मुशाफरीला ? '

' मी दिवसांनीं हिशेब करीत नाहीं. युगांनीं करतों ! माझ्याइतका जग पाहिलेला प्रवासी, हजारों तऱ्हांचीं माणसं भेटलेला भटक्या, तुला त्रिभुवनांत दुसरा आढळणार नाहीं ! '

त्याचें हें बोलणें मला मोठें विक्षिप्तपणाचें वाटलें. पण सकाळपासून मला अस्वस्थ करून सोडणाऱ्या प्रश्नाचें उत्तर कदाचित् हा बडाईखोर वेडाच बरोबर देऊं शकेल असें वाटून मीं त्याला म्हटलें ' आ—नाहीं, नाहीं ! तुम्हीं खूप खूप माणसं पाहिलीं आहेत. तेव्हां तुम्हांला माझ्या एका शंकेचं निरसन करतां येईल. मनुष्य सज्जन आहे कीं दुष्ट आहे ? तो खरोखरच सुधारत आहे कां सुधारणेच्या नव्या गोंडस नांवाखालीं तो आपल्या रानटीपणाचं प्रदर्शनच मांडीत राहिला आहे ? मनुष्य अजून पशूच आहे कीं तो होण्याच्या मार्गाला लागला आहे ? '

मला मध्येंच थांबवून तो वृद्ध म्हणाला, ' उगीच बडबडूं नकोस. पोकळ शब्दांनीं आयुष्यांतलीं कोडीं सुटत नसतात. मनुष्यांतलें पशुत्व नाहींसें करण्याचे प्रयोग या जगांत हजारों वर्षं चालले आहेत. पण विनाशक विमानं किंवा विषारी वायू शोधून काढण्याइतकं हें काम सोपं नाहीं बाबा ! पाषाणांतून फुलं फुलवायचीं आहेत इथं ! नवा मनुष्य निर्माण करण्याच्या या प्रयोगांत कांहीं कांहीं वेळां असे भयंकर

अनुभव येतात कीं, तो प्रयोग सोडून कुठं तरी दूर दूर पळून जावं असं मला वाटतं !'

'तुम्हांला ?'

'हो मला ! हा प्रयोग मींच चालविलाय् !'

वेड्याच्या तोंडाला काय लागायचें म्हणून मी गप्प बसलों. तो वृद्ध पुढें बोलूं लागला, 'हातातोंडाशीं आलेला एकुलता एक मुलगा मृत्यूनें हिरावून नेला म्हणजे त्याच्या आईची जी करुणाजनक स्थिति होत असेल तिचा अनुभव मीं अनेकदां घेतला आहे. जगांतल्या अनेक ऋषींनीं, संतांनीं आणि महात्म्यांनीं अशावेळीं माझं सांत्वन केलं आहे. दुःख विसरून पुन्हा दरवेळीं मीं नव्या ईर्षेनं या प्रयोगाला सुरवात केली आहे.'

हें बोलतां बोलतां तो वृद्ध आणखी जवळ सरकून अगदीं सलगीने माझ्याशीं बोलूं लागला. त्यानें सहज माझ्या खांद्यावर हात ठेवला. तो हात गार गार लागेल आणि सुरकुतलेला असेल अशी माझी कल्पना होती. पण तो किती उबदार आणि किती गुळगुळीत—अगदीं लहान मुलाच्या गालाइतका मऊ होता तो !

तो वृद्ध म्हणाला, 'नवा मनुष्य निर्माण करण्याच्या माझ्या प्रयोगाला फार दिवस झाले हें खरे ? असल्या गोष्टींत विलंबामुळें लोकांचा विश्वास नाहींसा होतो हेंहि कांहीं खोटें नाहीं. पण आतांपर्यंत हा प्रयोग करतांना अज्ञानामुळें माझ्या हातून फार चुका होत आल्या होत्या. भीति, प्रीति नीति, कीर्ति, संपत्ति वगैरे निरनिराळ्या प्रकारचा मालमसाला घालून मीं पुनः पुनः नवा मनुष्य निर्माण केला पण प्रत्येक वेळीं तो मूळपदावर गेला. आतां मात्र एक अगदीं नवीन कल्पना सुचलीय् मला ! ती यशस्वी होणारच होणार अशी माझी श्रद्धा आहे. म्हणून तर मी या पडशींत नव्या मनुष्याच्या निर्मितीला लागणारें सर्व साहित्य घालून कुठं-तरी एकांतांत बसायला चाललोंय् ! ही जागा त्या दृष्टीनं जरा बरी दिसली म्हणून—'

तो भोंवतालीं पाहूं लागला. त्याच्या पडशींत काय काय साहित्य आहे हें पाहण्याचा मोह मला अगदीं अनावर झाला. मीं हळूच त्याच्या पडशीचें तोंड उघडून आंत हात घातला. एकदम दोन छोटे फोटो लागले माझ्या हाताला. मीं ते काढून पाहिले. अंधारांत अगदीं अंधुक अंधुक दिसत होतें. पण त्या फोटोंतला

एक गांधीजींचा आहे आणि दुसरा लेनिनचा आहे हें माझ्या लक्षांत आलें. फोटो पडशींत ठेवून मी तिच्यांतल्या दुसऱ्या वस्तु चांचपूं लागलों. एक कोयता माझ्या हाताला लागला, त्यानंतर एक सूत कातायची टकळी, एक हातोडा, एक—

तो वृद्ध माझ्याकडे वळून म्हणाला, ' किती वाजले ? '

माझें घड्याळ तर मघाशींच बंद पडलें होतें. आधीं त्याला किल्ली देऊन मग नऊ वाजल्याची थाप मारावी म्हणून मी वांकून घड्याळाला किल्ली देऊं लागलों. किल्ली देऊन मी वर मान करतों तों—

तो शेजारचा वृद्ध आपली पडशी घेऊन भराभर चालूं लागला होता. त्याला थांबविण्याकरतां हांका माराव्यात असा विचार माझ्या मनांत आला ! पण त्याचें नांव—इतका वेळ त्याच्याशीं बोलून त्याचें नांवसुद्धां कळलें नव्हतें मला ! त्याला कशी हांक मारावी या विचारांत मी होतों. इतक्यांत जणुं काय माझ्या घड्याळांतूनच एक अस्फुट ध्वनि माझ्या कानावर पडला—' काळपुरुष ! '

इतका वेळ ही साधी गोष्ट आपल्या लक्षांत कशी आली नाहीं याचें माझें मलाच आश्चर्य वाटूं लागलें. काळपुरुषाच्या त्या पडशींत आणखी कांहीं पुष्कळ सामान होतें. तें सारें आपल्याला पहायला मिळालें असतें तर किती बरें झालें असतें, असा विचार मनांत येऊन मी अगदीं अस्वस्थ होऊन गेलों.

त्या लोकविलक्षण पुरुषाच्या मागून धांवत जाऊन त्याला गाठावें म्हणून मी उठलों, डोळे ताणताणून अंधारांत मी पाहूं लागलों. पण त्याची आकृति केव्हांच दिसेनाशी झाली होती.

## सतरा जून ५

मृत्यूनंतर मनुष्याचें काय होतें याविषयीं मी अत्यंत साशंक आहें. देहावसान होतांच मनुष्याचा जीवात्मा परलोकाची वाट चालूं लागतो, या लांबच्या प्रवासांत उन्हाचा त्रास होऊं नये म्हणून भटजीमार्फत त्याला छत्री, पादत्राणें वगैरे साहित्य

पोंचतें करतां येतें, हा आत्मा यमराजाच्या कचेरींत पोंचतांच चित्रगुप्त त्याचा हिशेब त्याच्या अंगावर फेंकतो आणि मग त्या स्वर्गीय हायकोर्टाच्या निर्णयाप्रमाणें तो जीव सुंदर अप्सरांना किंवा तप्त लोखंडी स्तंभांना मिठ्या मारायला जातो इत्यादि कल्पना मनोरंजक आहेत यांत संशय नाहीं. अरेबिन नाइटसूमधल्या अल्लाद्दिनाप्रमाणें आपणही एक जादूचा दिवा पैदा करायचा, तो दिवा घासतांच समोर हात जोडून उभ्या राहणाऱ्या राक्षसाला ताजमहालाप्रमाणें एक सुंदर राजवाडा बांध असा हुकूम सोडायचा आणि त्या मंदिरांत पत्ते कुटण्यांत किंवा विटीदांडू खेळण्यांत सर्व वेळ गेल्यामुळें परीक्षेंत नापास व्हायची पाळी आली तर त्याच राक्षसाला मास्तरांच्या मानगुटीवर जाऊन बसायला सांगायचें, असे बेत ज्या वयांत मी करीत असें, त्यावेळीं परलोकांतल्या बक्षिसांच्या आणि शिक्षांच्या या चमत्कृतिपूर्ण वर्णनावर माझा सहज विश्वास बसत असे !

पण आतां ?

थंडीच्या दिवसांत धुकें पडतें तें सकाळीं किंवा संध्याकाळीं ! मानवी मनांतही अंधश्रद्धा प्रबळ होण्याच्या वेळा दोनच असतात. पहिली बाळपण आणि दुसरी म्हातारपण ! त्या दोन्हींच्यामध्यें मी सध्यां उभा असल्यामुळें परलोकाला जाणाऱ्या मनुष्याच्या प्रवासाच्या सर्व सुखसोयी करतांना आमच्या धर्मानें त्याच्या व्यसनांची कांहींच व्यवस्था कां करूं नये याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें ! मृतात्म्याला धूम्रपानाचा नाद असला तर त्याचे दिवस करतांना भटजीबोवांना विड्यांचीं पांच पन्नास तरी बंडलें द्यायला नकोत का ? समजा, परलोकीं गेलेला गृहस्थ दारू पीत असेल ! अनेक सभ्य गृहस्थांप्रमाणें अगदीं चोरून पीत असेल तो ! पण परलोकाच्या मार्गावर इंद्राचें लायसेन घेऊन उघडलेलीं बेवड्याची किंवा बीरचीं दुकानें नसल्यामुळें त्याला क्षणोक्षणीं चुकल्या चुकल्यासारखें झाल्याशिवाय राहील का ? बहुधा तो पुढें जायचें सोडून पुन्हां पृथ्वीकडेच तोंड फिरवील ! असा कांहीं भलता घोंटाळा होऊं नये म्हणून दारूबाजाचे दिवस करतांना तो ज्या दारूचा भोक्ता असेल तिच्या दहावीस तरी बाटल्यां उपाध्यायांना द्यायलाच हव्यात ! मृतात्मा इहलोकीं चोरून दारू पीत असला तर हें मद्यपान घेणाऱ्या भिक्षुक महाशयांनींही त्या बाटल्या आपल्या धाबळींत गुंडाळून घरीं न्याव्यात म्हणजे झालें !

● ● ●

परलोकावर विश्वास नसल्यामुळें श्राद्धासारख्या विधीवर माझी मुळींच श्रद्धा नाहीं. मात्र स्वतःला पूज्य किंवा प्रिय वाटणाऱ्या मनुष्याचा मृत्युदिन मला नेहमीं हटकून आठवतो आणि त्या दिवशीं मी कितीही कामांत असलों तरी माझा जीवनमार्ग उजळविणाऱ्या त्या व्यक्तीच्या स्मृतिसहवासांत मी चारदोन घटका मोठ्या आनंदांत घालवितों! प्रवासांत असलेल्या भाविक माणसानें स्टेशनावर उतरून घाईघाईनें पडशींतल्या देवांची पूजा करावी, तशांतलाच प्रकार होत असेल हा! पण एक ऑगस्टला लोकमान्यांचा एखादा तेजस्वी लेख वाचला नाहीं किंवा सात नोव्हेंबरला केशवसुतांची कविता काढून त्यांतल्या मला विशेष आवडणाऱ्या 'क्षणांत नाहींसे होणारे दिव्य भास' सारख्या कवितांवरून नजर फिरविली नाहीं, तर बागेंत जाऊन फुलें न वेंचणाऱ्या किंवा नदीवर जाऊन तिच्यांत न डुंबतां परत येणाऱ्या मुलासारखा अस्वस्थ होतों मी!

परवां सतरा जूनला आगरकरांच्या लेखसंग्रहाचें एक पुस्तक उघडून मी तें याच भावनेनें चाळीत बसलों होतों! 'इंग्लिश राज्यांत पोटभर अन्न मिळत नाहीं' हा त्यांचा लेख मीं पूर्वी दोनतीनदां वाचला होता. पण आज तो पुन्हां वाचतांना माझ्या मनांत विचार आला—आगरकर नुसते सुधारक नव्हते! ते द्रष्टेही होते!

पुढला लेख मी वाचूं लागणार इतक्यांत माझे एक स्नेही मला भेटायला आले. त्यांनीं स्वतः पुनर्विवाह केला होता. आपल्या मुलाच्या लग्नांत सप्रेम भेट म्हणून वधूपक्षाकडून आलेल्या मोटारीचा जरी त्यांनीं स्वीकार केला असला तरी हुंडा म्हणून त्या लग्नांत त्यांनी पैसुद्धां घेतली नव्हती! कोणत्याही निमित्तानें सभेंत बोलायची पाळी आली, कीं 'क्रांती तुमच्या दाराशीं येऊन ठेपली आहे, ती तुमचें दार ठोठावीत आहे, ती तुमच्या दारावरली विद्युत्घंटा वाजवीत आहे. तुम्हीं दार उघडून हंसतमुखानं तिचं स्वागत केलं नाहीं तर ती दार फोडून आंत घुसल्याशिवाय राहणार नाहीं!' वगैरे वगैरे वाक्यें उच्चारून ते लोकप्रिय नटाप्रमाणें अशा टाळ्यामागून टाळ्या घेत कीं माझ्यासारख्या शांत वक्त्याला क्षणभर त्यांचा हेवा वाटूं लागे.

आरामखुर्चीत अंग टाकतां टाकतां माझ्या हातांतल्या पुस्तकाकडे पाहून 'आगरकर ? हंः' एवढेच उद्गार त्यांनीं काढले. लगेच धूम्रपानाकरतां सिगारेट शिलगावून आणि चार दोन धूम्रवलयें हवेंत निर्माण करून ते म्हणाले' "अहो

भाऊराव, तुम्ही फारच मागासलांत बुवा! तसं पाहिलं तर माझ्यापेक्षां पांच वर्षांनीं लहान आहांत तुम्ही! पण तारुण्य हें मनावर अवलंबून असतं महाराज! वेड्यासारखे आगरकर काय वाचतांय् अजून? रसेल वाचा, फ्रॉइड वाचा, मार्क्स वाचा. सुटाबुटांच्या युगांत वल्कलं नेसून उगीच स्वतःचें हंसं कां करून घेतां?"

माझ्या हातांतल्या पुस्तकाकडे तुच्छतेनें पाहात आणि एखाद्या कुशल सारंगीवाल्यानें क्षणार्धांत विविध मधुर स्वर काढावेत त्याप्रमाणें निरनिराळ्या आकाराचीं सुंदर धूम्रवलयें निर्माण करीत ते आरामखुर्चींत पडून राहिले.

त्यांच्या त्या हल्ल्याने क्षणभर मी गोंधळून गेलों. माझ्या मनांत आलें— आगरकरांवरली आपली भक्ति ही बाळपणांतल्या मैत्रीसारखी आंधळी आहे काय? लहानपणींच्या मैत्रीचे नाजुक पाश आपण कधींच तोडूं शकत नाहीं! तसें पाहिलें तर बालवयांतल्या निकट परिचयाखेरीज त्या भोळ्याभाबड्या स्नेहाला दुसरा कसला आधार असतो? वाङ्मयांतली विभूतिपूजाही अशीच अंध असते काय? लहान मुलाला भिंतीवरील मांजराची सावली पाहून वाघ दिसल्याचा भास होतो. विशी उलटण्यापूर्वीं आपण ज्या व्यक्ती, जीं ध्येयें, आणि जें वाङ्मय पूज्य मानूं लागतों, त्यांत अज्ञानामुळें किंवा स्वप्नाळुपणामुळें उत्पन्न झालेल्या अवास्तव आदराचा असाच भाग असला तर—

ही कल्पना मनांत येतांच आपल्या आवडत्या चित्रावर कुणीतरी शाईचे डाग पाडावेत तसें वाटूं लागलें मला! पण मी स्वस्थ आहें असें वाटून माझ्या स्नेह्यांना अधिकच चेव आला! आपल्याला फक्त एकच श्रोता आहे हें लक्षांत न घेतां ते जोरजोरानें बोलूं लागले—' हें पहा भाऊराव, आगरकरांचें कार्य कधींच संपलं आहे. पंचवीस वर्षं झालीं त्याला! ज्या दिवशीं मीं पुनर्विवाह केला, त्याच दिवशीं–ज्या दिवशीं मी मुलाचा पैसुद्धां हुंडा घेण्याचें नाकारलें त्याच दिवशीं–आगरकरांचं कार्य पूर्ण झालं. आतां त्यांचे लेख म्हणजे—माझी उपमा थोडी फटकळपणाची असली तरी अगदीं समर्पक आहे हं! आमच्यासारखीं माणसं सिगारेट ओढून झाल्यावर मागचीं थोटकं रस्त्यावर फेंकून देतात ना? तसं आहे हें तुमचं सारं टिळक–आगरकरांचं वाङ्मय! रस्त्यावरलीं तीं थोटकं भिकारी उचलतात नि तीं पुन्हां ओढून चार झुरकेही मारतात! त्याच्याप्रमाणें शाळा मास्तरांनीं नि शाळेंतल्या पोरांनीं या जुनाट वाङ्मयांतल्या उताऱ्यांची खुशाल पोपटपंची करीत बसावं पण तुमच्यासारख्या साहित्यिकांनीं—'.

सिगारेट ओढण्याकरतां स्वारी थांबली. माझ्या मनांत आलें–धूम्रपानाचा हा फायदा आपल्या कधींच लक्षांत आला नव्हता. कुणाचीही बडबड बंद करायची तर त्याला सिगारेट ओढायला द्यावी आणि त्याचीं धूम्रसुंदरीचीं पहिलीं उत्कट चुंबनें संपायच्या आंतच संभाषणाची गाडी दुसऱ्या रुळावर न्यावी! आतांच्या या संधीचा मी तसाच फायदा घेणार इतक्यांत स्वारीला पुन्हां वाचा फुटली! धूम्रपानानें विचारशक्ति प्रज्वलित होत असल्यामुळेंच कीं काय आतां त्यांचें वक्तृत्व अधिक रंगांत आलें. क्रांति लवकरच दार ठोठावूं लागणार असें मला वाटूं लागलें! स्वारी म्हणत होती 'अरे पुराणपुरुषा, आज स्वर्गातून आगरकर खालीं आले तर ते अगदीं चकित होऊन जातील आमची प्रगती पाहून! बायकांनीं जाकिटें घालावींत म्हणून केवढे अग्रलेख लिहावे लागले होते त्यांना! पण आतां बायका जाकिटंच काय, कोट पँटसुद्धां घालूं लागल्या आहेत! आजचीं बायकांचीं लांडीं आणि तलम चोळकीं पाहिलीं म्हणजे आपण हिंदुस्थानांत आहों कीं युरोप–अमेरिकेंत आहों याचा आगरकरांच्या आत्म्याला भ्रम पडेल! अंडीं खायच्या बाबतींत तुझे बद्धिवादी आगरकर इकडल्या तिकडल्या माहितीला शास्त्रीय स्वरूप देवून जवळजवळ सनातन्यासारखे विरोध करीत होते! आज त्यांच्या आत्म्यानं पुण्यामुंबईंत एक तासभर फेरफटका केला तर ज्या प्रेमानं ब्राह्मणांनीं पूर्वी आळूभात खाल्ला त्याच प्रेमानं आज ब्राह्मण तरुणतरुणी ऑम्लेटावर ताव मारीत आहेत असें त्यांना दिसून येईल. आगरकर जुने झालें, फार जुने झाले, याचा हा पुरावाच नाहीं का?'

आतां मात्र मला राहवेना, मी एकदम म्हणालों, 'आगरकरांचं कितीतरी काय अजून व्हायचं राह्यलंय्!'

'कुठलं?' माझ्या स्नेह्यांनीं चेष्टेनं प्रश्न केला.

मी हातांतलें पुस्तक उघडून म्हणालों, 'हा एकच लेख ऐका. लेखाचा मथळा 'इंग्लिश राज्यांत पोटभर अन्न मिळत नाहीं' असा आहे. शेवटच्याच दहा-पंधरा ओळी ऐकल्यात तरी चालेल. आगरकर म्हणतात, 'इंग्लंडांतील मनुष्य सरासरीनें बत्तीस वर्षें जगतो व हिंदुस्थानांतील मनुष्य तेवीस वर्षें जगतो. हीं तेवीस वर्षें तरी आम्ही सुखानें घालवितों काय? सुखाचें नांव कशाला? कोणाला पोटभर अन्न आहे तर ढुंगणाला चिरगुट नाहीं; कोणाला

चिरगुट आहे तर आश्रयाला खोपटं नाहीं. पृथ्वींतील साऱ्या लोकसंख्येचा सहावा भाग या देशांत राहतो. येथील जमीन सुपीक; येथें सर्व प्रकारच्या हवा; व्यापाऱ्यांची जहाजें चालण्याजोग्या येथें मोठमोठ्या नद्या; येथील रानांत व डोंगरांत सांपडणार नाहीं अशा एका झाडाचें नांव घेण्याची मुष्कील; बहुतेक धातूंचा हवा तेवढा पुरवठा; तीन हजार वर्षांची आमची पुरातन सुधारणा—अशा प्रकारचे आम्ही लोक असून आज आम्हांस दुपारची नड कशी भागवावी अशी प्रतिदिवशीं पंचाईत पडावी काय? रात्रंदिवस दुष्काळाची धास्ती; अनेक प्रकारच्या रोगांनीं, विशेषतः अपुरत्या अन्नामुळें, वस्त्रामुळें व राहण्याच्या घाण जागेमुळें उत्पन्न होणाऱ्या तापामुळें ज्याच्या त्याच्या घरांत दृष्टीस पडणारी विपत्ति; गाल बसलेले, डोळे खोल गेलेले; साऱ्या अंगास वळया पडलेले; सारांश भुकेने सर्व प्रकारें गांजून आयुष्यास कंटाळलेल्या लोकांचे गांवोगांवीं व शहरोशहरीं दिसणारे थवे—'

वाचतां वाचतां मीं मान वर करून पाहिलें. आमचे दोस्त केव्हांच पसार झाले होते.

● ● ●

त्या दिवशीं मीं आगरकरांचा आणखी कुठलाहि लेख वाचला नाहीं. पण हाताच्या बोटांत शिरून सलत राहिलेल्या कुसळाप्रमाणें एक गोष्ट राहून राहून मला अस्वस्थ करून सोडीत होती! माझें मन म्हणत होतें—वारसांच्या बाबतींत जगांत सर्वांत दुर्दैवी जर कोण असतील तर ते संत, सुधारक आणि क्रांतिकारक! श्रीमंत बापाचा एखादा दिवटा मुलगा प्रथम अत्तराचे आणि मग शेणाचे दिवे लावतो हें खरें! पण अनेक धनिकांचीं मुलें वडिलोपार्जित वैभव सुरक्षित राखतात. एवढेंच नव्हे तर त्यांत आपल्या कर्तबगारीनें नवी भरहि घालतात. पण संत, सुधारक आणि क्रांतिकारक यांच्या परंपरा मात्र या जगांत सहसा अखंड चालत नाहींत! त्यांच्या आचारविचारांत अग्नि प्रज्वलित ठेवण्याचें काम कुणीच करीत नाहीं. त्या अग्नीवर सांचणाऱ्या राखेचा अंगारा एकमेकांना लावण्यांत आणि त्यांतच धन्यता मानण्यांत त्यांचे शिष्य गढून जातात.

नाथषष्ठी पाळणारे अनेक लोक मी पाहिले आहेत. ते तो दिवस फार पवित्र मानतात. प्रसादाला पांचपन्नास माणसें बोलावून त्या दिवशीं हवातेवढा खर्चहि करतात ते! पण एकनाथाच्या साधुत्वाचा त्यांना अगदीं मनापासून अभिमान

आहे, ते खरेखुरे नाथभक्त आहेत, असें म्हणायला मात्र मी कधींच तयार होणार नाहीं. त्यांची भक्ति, जिभेवरली आहे; जिथें जीवनांतली सारीं दुःखं धगधगत असतात त्या अंतःकरणांतली नाहीं. एकनाथांची परंपरा त्यांच्या प्रासादिक ग्रंथांचीं दीडदोन पानें वाचून किंवा त्यांच्या नांवानें पांचपन्नास माणसांना प्रसाद वांटून चालणार नाहीं. ती चालविणाऱ्या लोकानीं, नाथ ज्या प्रेमानें तापलेल्या वाळवंटांत तळमळणाऱ्या अस्पृश्य मुलीला पोटाशीं धरायला धांवले, त्याच प्रेमानें आज हरिजनांना जवळ करायला हवें. त्यांच्या उन्नतीकरितां झटायला हवें. रामदासांची परंपरा दासनवमी साजरी करून किंवा म्हातारपणीं मनाच्या श्लोकांचीं पारायणें करून अखंड राहणार नाहीं. व्यक्तिसुखापेक्षां राष्ट्राचें स्वातंत्र्य हें कोटि-पटींनीं श्रेष्ठ असतें, या तत्त्वाचें आचरण करणारे लोकच ती पवित्र परंपरा जिवंत ठेवूं शकतील. तानाजी घोरपड लावून सिंहगडावर चढला म्हणून त्याच्या स्मृति-दिनादिवशीं तोच प्रयोग करायला सिंहगडावर जाणें ही त्याच्यासारख्या कडव्या देशभक्ताची पूजा नव्हे. शुद्ध विडंबन आहे हें त्याच्या वीरवृत्तीचें. तानाजीची उज्ज्वल परंपरा देशासाठीं हांसत मरणाराला मिठी मारणारे तरुणच चालवूं शकतील! मग तें मरण तुरुंगांत येवो, फांसावर येवो किंवा रणांगणावर येवो!

ही जाणीव आपल्या समाजांत ज्या दिवशीं उत्कट होईल त्या दिवशीं जुने लेखक म्हणून सांदीकोंपऱ्यांत आगरकरांना फेंकून द्यायला माझे स्नेही धजणार नाहींत! त्यांचें वाङ्मय हें सिगारेटचें थोटूक नाहीं, ती जळती ज्योत आहे, पुन-र्विवाहासारख्या सुधारणा हा आगरकरांना हव्या असलेल्या क्रांतींतला अगदीं दुय्यम भाग होता, हें सहज त्याच्या लक्षांत येईल. कदाचित् पुढल्या सतरा जूनलाच ते माझ्याकडे येऊन म्हणतील 'भाऊराव, मधून मधून आगरकर किती मार्मिक लिहितात नाहीं? मीं सहज खुणा केलेलीं हीं दोन वाक्यें पहा—"या देशांत सध्यां अक्कल व अम्मल यांची काडीमोड झाली आहे! कोठें दहाबारा रुपयांची जागा रिकामी झाली कीं, तीबद्दल शेपन्नास मॅट्रिक्युलेशन पास झालेल्या उमेदवारांचे अर्ज! धिक् तुमची विद्या आणि तुमचें कर्तृत्व! कष्टानें संपादिलेल्या विद्येचा असा सवंग विक्रय करायचा काय? विद्यार्जनानें विकसित झालेलीं मनें स्वतंत्र धंदे स्थापण्याकडे लावाल, तर तुम्हांस अन्नाचीं किंवा मानाची काय वाण पडणार आहे? प्रजेची दारुण दैन्यावस्था कोणत्याहि राज्यकर्त्यास केव्हांतरी विघातक झाल्यावांचून राहत नाहीं!'

# कवि, चोर आणि पोलीस ६

भुतें, चोर आणि गस्तवाले पोलीस यांनाच फक्त मध्यरात्रीं फिरण्याचा षोक असतो असें नाहीं ! या तीन सन्मान्य निशाचरांच्या पंक्तींत कवींनाही जागा द्यायला हवी. मात्र चार तऱ्हांच्या या चार प्राण्यांची सहसा गांठ पडत नाहीं ! भुतें ज्याचा सूड घ्यायचा असेल त्याच्या उरावर बसण्याकरतां आणि चोर चोरी करण्याकरतां मध्यरात्रीं घरांत शिरत असतात, गस्तवाले शक्य तितक्या उच्च स्वरांत 'घरवाले, हुश्शार हाय्' अशी गर्जना करीत भर बारा वाजतां घरवाल्याची झोंप उडवून लावीत रस्त्यानें डुलत डुलत जात असतात, आणि जी प्राणिमात्राची रात्र तोच कवीचा दिवस अशी श्रद्धा असल्यामुळें आपल्या प्रतिभेच्या स्वैर-संचाराला चालना मिळावी म्हणून ऐन मध्यरात्रीं घराबाहेर पडून कवी कुठेंतरी दूर दूर एकांतांत जाऊन बसतात !

असाच एक कवि काल मध्यरात्रीं काळोखांतून गांवाच्या सीमेवर ह्या दत्ताच्या देवळापाशीं जाऊन बसायचें नि एक सुंदर प्रणयगीत रचायचें या बेतानें आपल्यां घराबाहेर पडला होता !

एवढ्या अपरात्रीं ऐन रंगांत आपल्या झोंपेचा भंग करणारा हा कोण विचित्र प्राणी आहे हें न कळल्यामुळें रस्त्यावरलीं कुत्रीं त्याच्या अंगावर मधून मधून भुंकत होतीं. पण त्याचें सारें लक्ष आकाशांत मधून मधून चमकत पसरलेल्या तारकांच्या सौन्दर्यावर खिळलें होतें. कवीच्या मनांत भराभर विचार येत होते. जगांतल्या साऱ्या राजेमहाराजांचे जामदारखाने एखाद्या मैदानांत नेऊन ओतले तरी त्या हिरेमाणकांच्या राशीची शोभा आकाशांतल्या या सौंदर्याच्या पासंगाला तरी लागेल काय ! छेः ! किती विचित्र कल्पना केली आपण ! पृथ्वीवर हिरे माणकें नेहमींच कुलपांत ठेवीत असतात ! सत्य आणि सौंदर्य हीं सुद्धां ज्या जगांत या नाहीं त्या रूपानें पोलिसांचा पहारा असल्यांवाचून सुरक्षित राहूं शकत

नाहींत, तिथें संपत्तीचें उघड्यावर प्रदर्शन मांडण्याची हिंमत कुणाला होणार ? परमेश्वर वेडा आहे म्हणूनच तो दररोज रात्रीं आपला अमोल जामदारखाना आभाळांत असा उघडयावर उधळत असतो ! त्याला चोरीची तर मुळींच भीति वाटत नसावी ! एखादेवेळीं या रत्नभांडारांतली एखादी लहान मोठी हिरकणी हरवते. तारा निखळून पडला असें जग म्हणतें त्यावेळीं पण परमेश्वराला त्या हरपलेल्या छोट्या खडयाचा कधींच पत्ता लागत नसावा ! समुद्रांतला एक जलबिंदु नाहींसा व्हावा इतकीच त्या गळून पडलेल्या चांदणीची त्याच्या दृष्टीनें किंमत !

कवीला एक शंका आली—हीं हिरे-माणकें कुलपांत नसूनही स्वर्गात चोऱ्या कशा होत नाहींत ?

लगेच त्या शंकेचें निरसनही झालें. परवां परवांपर्यंत कोकणांत आणि गोमंतकांत चोरी ही अगदीं अपरिचित अशी चीज होती. तिथल्या लोकांना रात्रीं भीति वाटे ती साप-किरडवांची, चोरांची नाहीं. दिवसा घराचें दार उघडें टाकायला तिथला मालक कचरे, तो घरांतली वस्तु चोरीला जाईल म्हणून नव्हे तर वादळी वाऱ्यानें बाहेरचा सगळा पालापाचोरा घरांत येईल म्हणून ! दरिद्री कोंकणसुद्धां जर चोरीपासून इतकें दूर राहूं शकतें तर कुबेरासारखे एकाहून एक धनत्तर देव असलेल्या स्वर्गात चोरी हा शब्द बृहस्पतीलासुद्धां ठाऊक नसेल ! इंद्राचा बजेटमधें पोलीसफोर्सचा खर्च नेहमींच शून्य असावा ! त्या बजेटामधला सर्वात मोठा आंकडा अप्सरांचीं नव्या फॅशनचीं पातळें, त्यांचीं नव्या तऱ्हेचीं कर्णफुलें, त्यांचें नवीन पद्धतीचें नृत्यसाहित्य आणि त्यांचे अगदीं १९४४ च्या घाटांघाटांचे अलंकार इत्यादिकांच्यासाठीं ‘ लष्करी खर्च ’ या सदराखालीं खर्ची पडत असावा ! कारण कुठल्याही ऋषीचा तपोभंग करण्याकरितां इंद्राला हें नाजुक लष्कर नेहमींच जय्यत तयार ठेवावें लागतें ! स्वर्गांत कधींकाळीं रिक्रूटभरती होत असेल तर ती फक्त सुंदर स्त्रियांची !

ही कल्पना मनांत येतांच कवि स्वतःशींच हंसला. तो हंसतच म्हणाला—देवांना नेहमीं भीति वाटते ती ऋषींची; चोरांची नाहीं. सारे चोर नि दरोडेखोर रावण, कंस, हिटलर, मुसोलिनी वगैरेंच्या रूपानें वेळोवेळीं पृथ्वीवर अवतार घेत असतांना स्वर्गांत चोर आणि दरोडेखोर उरणार तरी कुठून ? छेः ! इंद्राच्या अमरावतींतल्या

किंवा कुबेराच्या अलकेंतल्या एखाद्या संपादकाला चोराची मुलाखत छापायची असेल तर त्यांना पृथ्वीवरच यायला हवें !

● ● ●

हा विचार कवीच्या मनांत यायला आणि त्याची दृष्टि आतांपर्यंत निर्मनुष्य असणाऱ्या रस्त्याच्या दुसऱ्या बाजूनें अंग चोरून जाणाऱ्या एका मनुष्याकृतीवर पडायला एकच गांठ पडली ! कवीचें कंप पावणारें काळीज म्हणूं लागलें—चोरच असावा हा ! नाहींतर लपत छपत कशाला चालला असता हा ! दिवसा मोटारी-खालीं सांपडून आपला पंचनामा होऊं नये म्हणून मोठमोठीं माणसेंसुद्धां रस्त्याच्या कडेनें चालतात हें खरें ! पण रात्रीं भिकारीसुद्धां रस्त्याचा राजा असतो. ज्याअर्थी हा मनुष्य असा चोरपावलांनीं रस्त्याच्या अगदीं बाजूनें चालला आहे—

कवीनें त्याच्याकडे निरखून पाहिलें. किती सावकाश चालला होता तो मनुष्य ! जणूं कांहीं बंगालच्या दुष्काळमधून पळून आलेला कुणी अनाथ शेतकरीच होता तो ! कंबरेवर दोन्ही हात ठेवून तो कां चालला होता हें कांहीं केल्या कवीला कळेना. शेवटीं त्यानें तर्क केला, हा म्हातारा चोर असावा ! अर्थात तो चोरी करणार ती बैठ्या घरातच. भिंतीवरून चढणें, खिडकींतून उडी टाकणें वगैरे नादियापद्धतीचीं धाडसी कामें कांहीं या मनुष्याच्या हातून होणें शक्य नाहीं. तथापि उद्यां रेडि-ओचें आमंत्रण आलें तर तिथें गाण्याकरतां किंवा हॉटेलांतल्या ग्रामोफोनवर वाजवण्याकरतां चोरावर एखादें सुंदर भावगीत लिहायची पाळी आली तर त्यासंबंधींची प्रत्यक्ष माहिती आपल्या संग्रहीं असावी हें बरें ! असा पोक्त आणि दूरदर्शी विचार करून कंबरेवर हात ठेवून हळुहळू चालणाऱ्या त्या म्हाताऱ्या चोरामागून कवी जाऊं लागला.

चोर गांवाच्या सीमेवरल्या दत्ताच्या देवळापाशीं जाऊन थांबला कवी आश्चर्यांत बुडून गेला. एका मोठ्या घुमटीएवढें देऊळ होतें तें ! त्यांतून दत्ताचें ! या देवळांत त्या बिचाऱ्या चोराला चोरायला काय मिळणार हेंच कवीला कळेना. तो स्वतःशींच पुटपुटला—महामूर्ख चोर दिसतोय हा ! बालाजीचं किंवा राधाकृष्णाचं देऊळ सोडून—

देवळाच्या पिछाडीला लपून बसून कवी वांकून वांकून चोराकडे पाहूं लागला. देवालयांतून येणाऱ्या मंद दिव्याच्या प्रकाशांत चोराचा चेहरा नीटसा दिसत नव्हता ! पण आपण तो कुठेंतरी पाहिला आहे असें राहून राहून कवीला वाटूं लागलें. एकदम त्याला आठवण झाली. तीस वर्षांपूर्वीची गोष्ट ! आपण दहा अकरा वर्षांचे होतों तेव्हां बैलगाडींतून सांगलीहून पंढरपुरला गेलों होतों. तेथें हा चेहरा — अरे बापरे ! थेट पंढरपूरच्या विठोबासारखा दिसतोय कीं तो !

देवळासमोर उभ्या असलेल्या त्या काळयासांवळ्या व्यक्तीला, मनांतसुद्धां चोर म्हणायची छाती आतां त्या कवीला होईना. देवावर विश्वास नसूनहि देव असावा, तर तो विठ्ठलासारखा असावा, भक्तानें फेंकलेल्या विटेला सुवर्णमंदिर मानून त्याच्यासाठीं तिथें तिष्ठत उभा राहणारा असावा, माणांच्या प्रेमानें मरणाला कवटळायला तयार झालेल्या भक्तासाठीं महाराचें रूप घेऊन त्याची सुटका करणारा असावा. माझ्यापाशीं हा ब्राह्मण, हा शूद्र, हा अतिशूद्र असा भेद नाहीं असें जगाला हडसून खडसून बजावून सांगणारा असावा, असें त्याला नेहमींच वाटे. ज्याचा चेहरा विठ्ठलासारखा आहे अशा त्या माणसाला—अरे बापरे त्याचा नुसता चेहराच पंढरपूरच्या विठोबासारखा नव्हता. त्यानें ते कटीवर ठेवलेले हात—अगदीं तीच ऐट—तीच लकब—

'काय विठोबा, पंढरपुराहून केव्हां आलांत ?' देवळांतून गंभीर स्वरानें कुणीं-तरी प्रश्न केला.

देवळासमोर उभी राहिलेली व्यक्ति—छेः ती कुणी सामान्य व्यक्ति नव्हती ! प्रत्यक्ष विठ्ठलच होता तो, हें कवीच्या आतां लक्षांत आलें—बोलूं लागली, 'महाराजा, काय सांगूं तुम्हांला ? आमच्या पंढरपुरांत आतां अन्नवांटप सुरू होणार आहे. मला रेशनिंगचं कार्ड मिळावं म्हणून पुजाऱ्यांनीं रीतसर अर्ज केला. पण सोलापूरच्या कलेक्टरनं त्या अर्जाला वाटाण्याच्या अक्षता दिल्या. पुण्यांत गमतीनं एका देवळाल्या माझ्या मूर्तीला उपाशी विठोबा म्हणतात लोक ! पण आतां माझ्यावर खरोखरीच उपाशी रहायची पाळी येणार असं दिसतंय् ! कलेक्टरचा निकाल कळल्यापासून रुक्मिणीनं तर माझे कान किटवून टाकले आहेत अगदीं. 'तुमच्या सगळ्या मित्रांच्याकडे चला; त्यांचा सल्ला घ्या' म्हणून हट्टच धरला तिनं ! मलाहि तें पटलं. आजपर्यंत विटेवर उभें राहून नि कटीवर हात ठेवून भागलं. पण

आतां हातपाय हालविल्याशिवाय आमच्यासारख्या देवांचासुद्धां निभाव लागणार नाहीं! महायुद्ध आहे हें महाराज! सध्यां कारकुनांना नि शिपायांना भाव आहे. देवांना नाहीं! म्हणूनच तिकडली शेजारती झाल्याबरोबर जो उठलों तो थेट इथं आलों. गांवांतल्या झाडून साऱ्या देवांना भेटलों.'

'काय म्हणतात ते?' दत्तगुरूंनीं प्रश्न केला.

'काय म्हणणार कपाळ? नारळाला नऊ पैसे पडूं लागल्यामुळें मारुतिरायांना सध्यां अर्धपोटींच राहावं लागतं! कापडाचा काळा बाजार सुरू असल्यामुळें सीतामाईला हवी असलेली साडी कांहीं प्रभु रामचंद्राला अजून पैदा करतां आली नाहीं! त्या विवंचनेंत आहे तो सध्या! पुन्हां वल्कलं नेसण्याची सूचना करणार आहे तो तिला. गणपतीला जो नैवेद्य मिळतो तो त्याच्या उंदरालासुद्धां पुरत नाहीं. पण आपल्या सेवकावर खरंखुरं प्रेम आहे गजाननाचं! स्वारी स्वतः उपाशी राहून आपला नैवेद्य उंदराला देत असते! पण याचा परिणाम त्याच्या प्रकृतीवर फार झपाट्यानं होतोय्! अतिशय खालावली आहे ती! कुठलं टॉनिक घ्यावं म्हटलं तर औषधांतही काळा बाजार आहेच! त्याला आतां लंबोदर म्हणणं म्हणजे सुद्धां त्याची क्रूरपणानं थट्टा केल्यासारखी होईल. येत्या गणेश चतुर्थीत त्याच्या आरतींतले 'सुखकर्ता दुखहर्ता' 'लंबोदर पितांबर' वगैरे शब्द काढून टाकावे लागतील लोकांना!'

'काळच मोठा कठीण आलाय्!' दत्तगुरु सुस्कारा सोडून उद्गारले!

विठ्ठलमूर्ती पुढें बोलूं लागली, 'इतर देवांच्याकडून कांहीं योग्य सल्ला मिळण्याचं लक्षण दिसेना. तेव्हां शेवटीं तुमच्याकडं आलों दत्तराज! सर्व देवांत तुम्हीं अधिक व्यवहारचतुर! आतांपर्यंत थोडे थोडके नाहीं, चोवीस गुरू केले आहेत तुम्हीं! तुम्ही जो मार्ग मला दाखवाल तो—'

दत्तमहाराज निराशेनें उद्गारले—'विठ्ठला, मीं चोवीस गुरू केले हें खरें! पण पैसा हा या जगांतला पंचविसावा गुरु आहे ही गोष्ट मी अजीबात विसरून गेलों! आम्ही आपले ब्रह्मचारी नि लंगोटी लावून गांवोगांव फिरणारे आहोंत म्हणून ठीक आहे! पण तुमच्यासारखे जे संसारी असतील त्यांचे हाल कुत्रासुद्धां खाणार नाहीं या काळांत!'

• • •

विठ्ठलाची आकृति मुकाट्यानें पुढें चालूं लागली. कवीला आतां मात्र राहवेना. त्यानें धांवत जाऊन मागून हांक मारली ‘ देवा—’

विठ्ठलानें मागें वळून विचारलें ‘ कोण आहेस तूं बाबा ? इथला रॅशनिंग ऑफिसर ? ’

‘ अं हं ! ’

‘ मग उगीच माझा वेळ कां घेतोस ? काकडआरतीच्या आधीं मला पंढरपूर गांठायला हवं ! ’

असे उद्गार काढून विठ्ठल पुढें झपझप चालूं लागला. कवीनें धांवत जाऊन त्याचे पाय धरले. आतां विठोबाला थांबणें प्राप्तच झालें. त्यानें नाइलाजानें प्रश्न केला ‘ उगीच कां आडवतोस मला ? कोण आहेस तूं ? ’

‘ मी एक कवि आहे ! ’

‘ कवि ? ठीक आहे. माझी आरती आहे ना ती ? तिची सुधारून नवी आवृत्ति काढायला हवीय् ! तेवढं काम कर तूं ! युगें अठ्ठावीस विटेवरी उभा ’ असं माझं वर्णन आहे त्या आरतींत ! तें बदलून रॅशनिंग कार्ड मिळत नसल्यामुळें मी आतां गांवोगांव फिरतोय अशा अर्थाच्या ओळी तयार कर तूं ! चार लुसलुशीत शब्द घातलेस तर ग्रामफोन कंपनी दहा रुपये देईल तुला. ’

कवि उद्गारला, ‘ देवा, हें सारं खरंच वाटत नाहीं मला अजून ! स्वतःचा जीव धोक्यांत घालून भानुदासानं ज्याची मूर्ति परत पंढरपुरला आणली तोच ना तूं विठ्ठल ? तुकोबाचे अभंग ज्यानें इंद्रायणीच्या पाण्यावर तेरा दिवस तरंगत ठेवले तोच ना तूं विठ्ठल ? ‘ तूं नैवेद्य ग्रहण केल्याशिवाय मी अन्नाला शिवणार नाहीं. ’ अशी प्रेमाची धमकी देऊन ज्यानं आपल्या ताटांतला घांस उचलायला लावलं त्या नामदेवाचा लाडका विठ्ठल तूंच ना ? ’

हें पहा कविराज, कवींना आणि बायकांना फार बडबडायची संवय असते. तुझ्या प्रत्येक प्रश्नाला होकार देऊन माझी मात्र मान दुखूं लागेल ! तुला एकदांच सांगतों—हाच का तो विठ्ठल असा माझ्याविषयीं उगीच संशय घेऊं नकोस ! पुंडलीकाचा आणि नामदेवाचा, दामाजीचा आणि तुकारामाचा, महाराष्ट्रांतल्या साऱ्या साऱ्या संतांचा आवडता विठ्ठल तो मीच ! माझें हें काळें सावळें रूप पहा,

माझे हे कटीवर ठेवलेले हात पहा. माझ्यांत कांहीं बदल झालेला दिसतोय का तुला ?'

कवीनें नकारार्थी मान हालविली.

विठ्ठल पुढें बोलूं लागला, ' पण माझ्यासाठी प्राण अर्पण करायला तयार असणारा एक तरी भक्त आज तुमच्यांत आहे का? देवाच्या नांवानं कपाळाला नुसता बुक्का लावून काय होणार? त्याच्यासाठीं आयुष्याची राखरांगोळी करून घ्यायची तयारी असावी लागते. देव आणि देश यांचें खरें सामर्थ्य त्यांच्या भक्तांत असतें कवि महाराज! हे भक्त दुबळे आणि ढोंगी झाले म्हणजे देव दगड ठरतो आणि देश गुलामगिरीत पिचत राहतो. इतरांची गोष्ट सोडून दे? स्वतःपुरतंच पहा तूं! तूं कवी आहेस. पण कवीच्या कर्तव्याला तूं आजपर्यंत कधीं तरी जागला आहेस का? ' मऊ मेणाहुनि आम्ही विष्णुदास, कठिण वज्रास भेदूं ऐसे ' ही भावना आपल्या बांधवांच्या अंतःकरणांत उत्पन्न व्हावी म्हणून तूं कधींतरी धडपड केली आहेस कां? ' आम्ही शूर मर्द क्षत्री नाहीं भिणार मरणाला ' हे उत्कट उद्गार आजच्या तरुणांच्या जिभेवर आजच्या शब्दांत नाचत राहावेत म्हणून तूं कुठला प्रयत्न केला आहेस? तुझ्या देशांतलीं लाखों माणसें अन्नाच्या अभावीं पटापट मरत असतांना तूं अजून कुणाच्या तरी गालावरल्या गुलाबांत नाहींतर आकाशातल्या चांदण्यांत गुंग होऊन जात आहेस! तुझ्या पन्नास काव्यसंग्रहांत वन्हि तो चेतवावा रे। चेतवीताचि चेततो!' या लायकीची एक तरी ओळ आहे का?'

विठ्ठलाचा संताप अनावर झाला आहे हें कवीनें ओळखलें. तो त्याला शांत करण्याकरितां कांहीं बोलणार इतक्यांत विठ्ठलानें कंबरेवरले आपले दोन्ही हात उचलले आणि कवीचे दोन्ही खांदे धरून त्याला गदगदा हालवीत तो म्हणाला ' जागा हो, वेड्या, अजून जागा हो!

● ● ●

कवीनें डोळे उघडून पाहिलें. त्याला कुणीतरी खांदे हालवून जागें करीत होतें. पण ती विठ्ठलाची आकृति नव्हती. गस्त घालणारा पोलिस होता तो! तो त्याला हलवून म्हणत होता ' उठा मिस्टर. हें दत्ताचं देऊळ आहे. दारूचा गुत्ता नाहीं!'

कवीनें डोळे चोळून वर पाहिलें. आकाशांतल्या तारकांच्याविषयीं निरनिराळ्या कल्पना करीत आणि प्रणयगीताला अनुकूल अशी एकही कल्पना न सुचल्यामुळें सुस्कारे सोडीत, आपण इथें बसलों होतों हें त्याला आठवलें' मधेंच आपला डोळा लागला असावा अशी त्याची खात्री झाली. तो विचार करूं लागला—आपल्याला विठ्ठल दिसला तो स्वप्नातच कीं काय? लगेच त्याच्या मनांत आलें — कांहीं कांहीं स्वप्नें जागृतींतल्या जीवनापेक्षांही श्रेष्ठ असतात. अशा स्वप्नावरच मानवता जगत असते !

●●●

# नवें जग ७

वेषभूषेंत रंगसंगतीचें स्थान फार मोठें आहे. नुसते उंची उंची कपडे पेहरल्यानें कांहीं कुणी सुंदर दिसत नाहीं. कपड्यांच्या किमतीपेक्षां रंगांच्यां संगतींतच विलक्षण मोहकता असते, प्रेक्षकाला मंत्रमुग्ध करून टाकण्याचें सामर्थ्य असतें तिच्यांत.

पला वाटतें—माणसांच्या वयांत, विद्वत्तेंत आणि विचारांत अशाच प्रकारच्या संगतीची आपण नेहमीं अपेक्षा करीत असतों. ती अपेक्षा विफल झाली म्हणजे परवां परवांपर्यंत तरी मला विजेचा धक्का बसल्यासारखें होत असे.

एकदां मीं माझा एक चित्रपट पहात होतों. माझ्याच शेजारीं एक बी. ए., बी. टी. विदुषी बसल्या होत्या. त्या विदुषी चित्रपटांतल्या कुठल्या तरी दोषासंबंधानें केव्हां बोलतील याचा नेम नसल्यामुळें मी भ्यालेल्या ससासारखा थोडासा अंग चोरूनच खुर्चींत बसलों होतों. एकदम विदुषीचे ओठ हलले. न्यायाधीशाच्या शब्दाकडे आरोपीचें लक्ष लागावें तशी माझी स्थिति झाली. पण त्या पंडिताबाईनीं मला फक्त एवढेंच विचारलें, 'नायिकेचं हें पातळ कुठं घेतलं हो?'

'मी या चित्रपटाचा कथालेखक आहे, प्रॉडक्शन मॅनेजर नाहीं.' उत्तर माझ्या अगदीं जिभेवर आलें असूनही तें त्या वेळीं माझ्या तोंडांतून बाहेर पडलें नाहीं. त्या बाईच्या भीतीनें नव्हे, तर खरोखर मी सर्द झालों होतों म्हणून! राहून राहून

माझें मन म्हणत होतें—या आधुनिक गार्गीनें मला हा प्रश्न विचारायला नको होता. तिनें कथानकांतले असले नसलेले असंख्य दोष दाखविले असते किंबहुना मी चित्रपटाच्या कथा लिहिण्यापेक्षां हरिदासाप्रमाणें कथा करीत सुटणें अधिक बरें होईल असा माझ्यावर शेरा मारला असता, तरीसुद्धां मला थोडें बरें वाटलें असतें. ती निदान महत्त्वाच्या गोष्टीसंबंधानें बोलत आहे एवढें तरी समाधान मला मिळालें असतें ! पण तिचा तो नायिकेच्या पातळाविषयीचा प्रश्न—तो सोडविण्याला कापड दुकानदाराचीच प्रतिभा हवी होती !

नवीं पातळें, नवे दागिने आणि नवीं मुलें कुठेंहि आणि केव्हांहि दिसलीं, कीं बायका त्याविषयीं प्रश्न विचारल्याशिवाय राहणारच नाहींत या समजुतीनें माझें या बाबतींत कुणीतरी समाधान करण्याचा प्रयत्न करील. पण ती पातळप्रेमी पंडिता हें आपल्यामध्यें आढळणाऱ्या विशिष्ट मनोवृत्तीचें प्रतीक आहे असेंच मला अलिकडे वाटायला लागलें आहे.

आपल्या भोंवतालचें जग झपाट्यानें बदलत आहे. पण आपलें मन मात्र अजून बदललें नाहीं. कपड्यालत्त्यांत आणि खाण्यापिण्यांत आपण नव्या गोष्टी हां हां म्हणतां आत्मसात् केल्या आहेत. पण काळाच्या विरुद्ध जातां येत नाहीं म्हणून नवे विचार आणि नव्या भावना यांचे आपल्या मनाला आपण जे रंग देतों ते फार कच्चे असतात. आपण वर्तमानपत्रें वाचतों, पण आपल्या दैनंदिन जीवनाचें चित्रण म्हणून आपण त्यांत रंगत नाहीं. आपण राजकारणाच्या गप्पा दररोज झोडतों. पण त्या केवळ शिळोप्याच्या गप्पा असतात ! आपलें मन अजून सामाजिक झालेलें नाहीं, नव्या जगाची निर्मिति नव्या मनांतूनच होणार आहे याची जाणीव आपल्याला अद्यापि फारशी झालेली नाहीं. म्हणून तर चाळीस कोटी लोकांना वर्षानुवर्षें मार्गदर्शक होणारा पुढारी आणि चाळीस लाख लोकांची दोन घटका करमणूक करणारी नटी हीं दोघें योगायोगानें खवळलेल्या समुद्रांतल्या एका होडींत असलीं आणि होडींतून कुणीतरी एखाद्यानें उडी टाकली पाहिजे असा बांका प्रसंग आला, तर कुणी उडी टाकणें इष्ट होईल अशा प्रकारचे गहन प्रश्न मधून मधून आपल्याकडे विद्यालयांतल्या वादविवाद-मंडळांत सुद्धां चर्चिले जातात.

व्यक्तींची गोष्ट हवी तर सोडून द्या. पण समाजाची नाडी ज्यांच्यावरून अचुक कळते असें आपण म्हणतों तीं आपलीं वर्तमानपत्रें तरी या नव्या मनाची जोपासना

करीत आहेत का ? पत्रकारांच्या संमेलनांत बोलायचें असेल तर या प्रश्नाचें ठासून होय म्हणून उत्तर द्यायला हरकत नाहीं. पण अगदीं प्रामाणिकपणानें एकांतांत या प्रश्नाचा विचार करायचें ठरविलें तर—

पहिली बायको जिवन्त असतांना दुसरें लग्न करण्याची साधी गोष्ट घ्या ! मी मुद्दामच तिला साधी म्हणतों. असल्या अनेक लग्नामागें मुकीं दुःखें-स्त्रियांचीं आणि क्वचित् पुरुषांचींहि-लपून बसलीं असतील हें मी जाणून आहे. तीं दुःखें वेशीवर टांगलीं पाहिजेत हेंहि मला मान्य आहे. पण एखाद्या संस्थानिकानें किंवा साहित्यिकानें दुसरें लग्न करतांच त्याच्याविषयीं अंकामागून अंक आणि स्तंभामागून स्तंभ भरीत बसणाऱ्या आमच्या अनेक वृत्तपत्रांना बंगाल ओरिसा यांच्यामध्यें जाऊन आलेल्या डॉक्टरवैद्यांच्या सविस्तर मुलाखती घ्यायचें कधीं सुचलें आहे का ? एका संकुचित सामाजिक प्रश्नावर रणें माजवून एका व्यापक राष्ट्रीय प्रश्नांची हेळसांड करणें हें निःसंशय नव्या मनाचें लक्षण नव्हे ! ज्यांना आपला उद्यांचा समाज दिसत नाहीं, त्यांचीं सुखदुःखें जाणवत नाहींत, तीं दुःखें दूर करण्याच्या उपायांत रमून जाण्याइतकी वृत्ति ज्यानीं संपादन केलेली नाहीं. त्या माणसांनीं आजच्या किंबहुना कालच्या शिळ्यापाक्या प्रश्नांना अवास्तव महत्त्व द्यावें यांत नवल कसलें ?

रशिया आणि हिंदुस्थान यांचीं चित्रें जेव्हां जेव्हां माझ्या डोळ्यांसमोर उभीं राहतात तेव्हां तेव्हां तर जुनें मन आणि नवें मन यांतलें हें अंतर मला अत्यंत तीव्रतेनें जाणवतें. स्टॅलिन किती क्रूर आहे आणि गांधी किती अहंकारी आहेत. असल्या सूक्ष्म प्रश्नांची छाननी करण्याइतकें पांडित्य माझ्यापाशीं नाहीं. मला या ज्ञानाची गरज कधींच जाणवली नाहीं. किंबहुना एखाद्या राष्ट्राची खरीखुरी प्रगति पहायची असेल तर त्यांतल्या लोकप्रिय पुढाऱ्याचें चरित्र किंवा त्याच्यावरच्या टीका वाचण्यापेक्षां तिथलीं वर्तमानपत्रें कुठल्या बातम्या छापतात आणि तिथलीं म्हातारीं माणसं काय काय उद्योग करतात हेंच मी आधीं पाहीन.

रशियाचें मला कौतुक वाटतें तें याचमुळें. आठव्या एडवर्डनें प्रियतमेच्या सहवाससुखाला मुकण्यापेक्षां राज्यत्याग पुरवला या भावनेनें गादी सोडली त्या-वेळची एक साधी गोष्ट आहे. एडवर्डचें राजत्यागाचें भाषण सुरू झालें तेव्हां रेडिओवरून तें ऐकणाऱ्या असंख्य इंग्लिश श्रोत्यांच्या चेहऱ्यावर उदासपणाची कळा

पसरली. तें भाषण संपलें तेव्हां अनेक स्त्रीपुरुषांनीं अश्रू ढाळले. इंग्लंडमधला एक नाट्यटीकाकार याप्रसंगीं म्हणाला, ‘ इंग्लंडच्या आणि इंग्लिश जनतेच्या अंतः-करणांतल्या एका अत्यंत नाजुक भावनेला मूठमाती देण्याचा हा प्रसंग आहे. ’ इंग्लंडप्रमाणें इतरहि देशांत प्रेमाच्या पायीं एका राजानें केलेल्या या राज्यत्यागाला विलक्षण महत्त्व दिलें गेलें. याला अपवाद फक्त एकच देश होता. तो म्हणजे रशिया. तिथलें प्रमुख पत्र ‘ प्रवदा ’. त्यानें फक्त एकशें छप्पन्न शब्द होतील एवढ्या या वार्तेच्या चार छोट्या तारा छापल्या. ‘ प्रवदा ’च्या त्या अंकांतली पहिल्या पानावरली महत्त्वाची बातमी निराळीच होती. दहा टन वजन घेऊन १९४२ मीटर उंच गेलेल्या एका अप्रसिद्ध नागरिकाच्या पराक्रमाचें वर्णन त्या अंकांतल्या पहिल्या पानावर छापलें होतें.

जी गोष्ट वर्तमानपत्रांची तीच वृद्धांची. निरनिराळ्या पेशांतलीं अनेक वृद्ध माणसें मला वारंवार भेटतात. त्यांतलीं सारींच हरि हरि म्हणत बसलेलीं असतात असें नाहीं. पण त्यांचे उद्योग पाहिले म्हणजे चित्रपट पाहतांना ‘ या नाटिकेचें पातळ केवढ्याला घेतलं ? ’ हा प्रश्न विचारणाऱ्या त्या विदुषीची मला आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. एका वृद्ध गृहस्थांनीं गीतेंत ‘ कर्म ’ शब्द किती वेळां व कुठें कुठें आला आहे याचें एक लांबलचक पद्यबद्ध टांचण केलें होतें. ते ऐकतांना कुणाही वाचकाला सध्यां आपला कर्मयोग ओढवला आहे असेंच वाटलें असतें. दुसऱ्या एका साठी उलटलेल्या सद्गृहस्थांनीं म्हाताऱ्या माणसांचा आखाडा सुरू केला होता. तसेंच पाहिलें तर व्यायाम आणि आरोग्य हीं सुप्रसन्न अशा प्रातः-काळाप्रमाणें प्रत्येकाला हवींहवींशी वाटणें हें स्वाभाविकच आहे. पण आरोग्य हें साधन नसून साध्य आहे अशा भावनेनें ते म्हातारेबुवा जेव्हां मला व्याख्यानाचे डोस पाजूं लागले तेव्हां मात्र माझें तोंड अगदीं कडू झालें. त्यांच्या या आखाड्यांत परकी सरकारकडून खूप दिवस पेन्शन घेऊन त्याला जेरीला आणण्याचा उदात्त हेतु असेल तिथपर्यंत मीं माझ्या कल्पनेला ताण दिला. पण शेवटीं जातां जातां त्यांनीं ‘ आत्मानं सततं रक्षेत् दारैरपि धनैरपि ’ हा संस्कृत डोस जेव्हां मला पाजला तेव्हां मात्र मी हतबुद्धच झालों. बायकापोरांचे बळी देऊन स्वतःचे प्राण वांच-विण्याचें हें अजब तत्त्वज्ञान सांगणारा मनुष्य एक मूर्ख असला तर त्या आचरट सुभाषितांची पोपटपंची करणारे शतमूर्ख आहेत असें मला वाटतें.

या म्हातारेबुवांची आठवण काल मला एकदम झाली. ती रशियांतल्या एका शंभर वर्षें वयाच्या वृद्धाची हकीकत वाचून रशियांतल्या अपूर्व क्रांतीच्या वेळीं या पाऊणशें वर्षांच्या म्हाताऱ्यानें तरवार गाजविली होती आणि तीहि नव्या पक्षाच्या अभिमानानें—क्रांतीच्या बाजूनें—नवा सुखी समाज निर्माण करण्याच्या अभिनिवेशानें! क्रांति होऊन एक पिढी झाली. दुर्दैवानें महायुद्ध सुरू झालें. जर्मनीची टोळधाड रशियावर आली. शंभरींतले म्हातारेबुवा जर्मनांनीं जिंकलेल्या एका खेड्यांत सांपडले. पण डोळ्यांत तेल घालून पहारा करणाऱ्या शत्रुपक्षाच्या शिपायांच्या हातावर तुरी देऊन ते तिथून पसार झाले आणि आज मास्कोंत सभांतून आणि रेडिओवरून ते युद्धप्रचाराचें काम उत्कृष्ट रीतीनें करीत आहेत.

नवें जग कधीं काळीं निर्माण होणार असेल तर तें असल्या म्हाताऱ्यांच्या जिवंत मनांतूनच होईल असेंच मला वाटतें. चित्रपटांतल्या नायिकेच्या पातळाची चौकशी करीत बसणाऱ्या तरुणींकडून किंवा गीतेंत ‘ कर्म ’ शब्द कितीदां आला हें मोजत बसणाऱ्या प्रौढांकडून होणारें हें काम नव्हे!

# अनावृत्त पत्र



चित्रपट पाहून रात्रीं बारा सव्वा बारा वाजतां मी घरीं परत येत होतों. रस्त्यावर चिटपांखरूं देखील फिरकत नव्हतें.

शांत शांत काळोख किती भयानक असतो! जणुं कांहीं मी एखाद्या भुयारांतूनच जात आहे असें वाटूं लागलें मला.

मी खिशांतून बॅटरी काढली; पण कळ कितीही दाबली तरी तिचा प्रकाश पडेना! आपली बॅटरी ही म्युनिसिपालिटीच्या बंबाची सख्खी बहीण आहे असा विचार माझ्या मनांत येतो न येतो तोंच रस्त्याच्या पलीकडे कांहींतरी सळसळलें. माझ्या अंगावर कांटा—अगदीं बाभळीचा—उभा राहिला. मी जागच्याजागीं थबकलों. पुढें जावें कीं नाहीं या विचारांत होतों मी! इतक्यांत माझ्या पायाला कसला तरी गार गार स्पर्श झाल्याचा भास झाला मला. ‘ साप, साप ’ म्हणून मी ओरडणार

होतों! पण आपल्या पायाला मिठी मारणारा प्राणी साप नसून एक कागद आहे असें त्याच्या फडफडाटावरून मीं ताडलें.

मीं तो उचलून घेतला. त्यांत काय लिहिलें आहे हें अंधारांत मला दिसेना. पण तें पत्र असावें असें मला वाटलें. कुणातरी प्रेमवेड्या तरुणाचें हरवलेलें काव्य-मय पत्र आतां आपल्याला वाचायला मिळणार असें वाटतांच मी झपझप पाऊल उचलून लगबगीने घरीं आलों. कपडेसुद्धां काढून ठेवले नाहींत. झटकन् दिव्यापाशीं गेलों आणि ज्योतिषानें केलेल्या पत्रिकेसारखा दिसणारा तो कागद उलगडून खालीं सहीच्या जागेकडे पाहिलें. कुणाचेंच नांव नव्हतें तिथे! पत्र मोठें रहस्यमय आहे अशी माझी खात्री होऊन चुकली.

मीं वर नजर वळविली. तिथले ते पहिले शब्द पाहतांच मला आश्चर्यमिश्रित भीतीचा धक्काच बसला! माझ्यांत सर्पाकर्षणाची कांहीं विशेष शक्ति आहे कीं काय तें मला कळेना! आतांपर्यंत दोन वेळा मला साप चावला आहे. आणि आतां तिसऱ्यांदा हा सर्पाचा पत्रव्यवहार दुसरा कुणाला न मिळतां माझ्याच वांट्याला कां यावा?

पण माझें कुतूहल मला गप्प बसूं देईना. मी तें पत्र वाचूं लागलों.

## लखनौच्या सर्पराजास अनावृत पत्र

पूज्य आणि प्रिय सर्पराज,

आज आम्ही अखिल महाराष्ट्रीय सर्प सप्रेमादर हें पत्र आपल्याला पाठवीत आहों. आमच्यांत—विशेषतः आमच्या कोंकणांतल्या ज्ञातिबांधवांत—असंख्य पोटभेद आहेत, अजून आमच्यापैकीं जो तो आपापल्या बिळांतच राहातो आणि स्वच्छंदीपणानें एकटाच फिरतो! संघ हीच कलियुगांतील शक्ति आहे हें म्युनि-सिपालिटीपासून युनिव्हर्सिटीपर्यंत निरनिराळ्या सार्वजनिक संस्थांत शिरणाऱ्या आणि तेथें आपली तुंबडी भरीत बसणाऱ्या अनेक पुच्छ विषाणहीन मानवांनी पुनः पुनः सिद्ध केलें असलें तरी सर्पजातीवर अद्यापि त्याचा कांहींच परिणाम झालेला नाहीं. असल्या संस्थांतून मतमोजणीकरतां नेहमीं हात वर केले जातात तें बरो-बरच आहे. ज्या लोकांना डोकें नाहीं त्यांनीं हात वर करूं नयेत तर काय करावें? आमची गोष्ट या मानवी राहूंहून निराळी आहे! आम्हां सर्पांना एवढासा धक्का लागला तरी लगेच डोकें वर करण्याची संवय असते! माणसांची गोष्ट तशी नाहीं.

मस्तक किंवा हृदय हा मनुष्याच्या शरीराचा आतां महत्त्वाचा भाग राहिलेला नाहीं. हल्लीं बहुतेक माणसांचें काळीज त्यांच्या खिशांतच असतें. खिशाचा निकटचा स्नेही म्हणजे हात. यामुळें या विसाव्या शतकांत चौकांत उभ्या असलेल्या पोलिसापासून कौन्सिलांत गेलेल्या सभासदापर्यंत सर्वांना हाताच्या बळावर आपआपलीं कामें उत्कृष्टपणानें पार पाडतां येतात. डोक्याची किंवा काळजाची त्यांना सहसा जरूरच लागत नाहीं.

प्रिय सर्पराज,

आरंभींच हें थोडें विषयांतर झालें, हें आम्ही कबूल करतों. पण हल्लीं मनुष्यजातींत लेखन किंवा वक्तृत्व यांचा विषयांतर हाच मुख्य गुण मानला जातो. मात्र आपण मनुष्य नाहीं याचा सर्व सर्पांना सदैव अभिमान वाटत असल्यामुळें आम्ही माणसांचें अनुकरण करणें कधींहि उचित होणार नाहीं. तेव्हां आज आपल्याला मुद्दाम हें अनावृत पत्र पाठविण्याची आम्हांला जी अचानक स्फूर्ति झाली. सर्प माणसांप्रमाणें टोळया टोळया करून राहत नसूनही या पत्राखालीं ज्या हजारों सर्पांच्या सह्या आम्हांला हां हां म्हणतां मिळाल्या, त्यासंबंधीं चार शब्द लिहिण्याची आपली परवानगी घेतों.

आदरणीय सर्पराज,

मनुष्याविषयीं कुठल्याही सर्पाला किती तिरस्कार वाटतो हें आम्हीं कांहीं आपल्याला सविस्तर वर्णन करून सांगायला नको. ज्या भूमीचा सर्प मालक असतो तिथें माणसाचें पाऊल पडलें कीं ती त्याला परकी होते! तरीही हा अन्याय सहन करून कुठेंतरी दूर रानावनांत, बिळांत, सांदीकोपऱ्यांत बिचारे साप आपलें निष्पाप जीवन कंठीत राहतात. पण या निर्वासित आयुष्याचा आनंद सुद्धां मनुष्यजात सर्पाला सुखासमाधानानें उपभोगूं देत नाहीं. आपल्या काव्यांतून आणि नाटकांतून ती नेहमीं त्यांची निंदा करीत असते. दुष्ट मनुष्याला हे शिष्ट लोक नेहमीं सर्पाची उपमा देतात. पण कुठलाहि सर्प केवळ स्वार्थाकरितां कधीं कुणाला डसला आहे का? त्याच्या शेंपटीवर जेव्हां कुणाचा पाय पडतो तेव्हांच तो त्या उपकारकर्त्याला दंश करण्याचा प्रयत्न करतो. इतकें साधें नि सरळ जीवन मनुष्यजातींतले कितीसे लोक जगतात. सर्पांत लांच खाऊन गबर होणारे अधिकारी नाहींत, दर आठवड्याला शिमगा साजरा करणारे साहित्यिक नाहींत, काळाबाजार

चालवून गरीबांचे प्राण घेणारे व्यापारी नाहींत–अगदीं काळसर्पांतसुद्धां नाहींत–कलेच्या गोंडस नांवाखालीं आपलें हिडिस चारित्र्य लपविणारे कलावंत नाहींत आणि उठल्यासुटल्या ध्येयवादाचा नगारा वाजवून कसोटीची वेळ येतांच पळून जाणारे बळे आणि तकलुपी तत्त्वनिष्ठही नाहींत ! आम्हां सर्पांत काळे, गोरे, पिवळे हे दुभेद नाहींत असें नाहीं; पण गोऱ्यांनीं काळ्यांना पिढ्यानूपिढ्या गुलामगिरींत ठेवलें आहे, किंवा पिवळ्यांनीं गारुड्याच्या टोपल्यांत कैदी होऊन पडलेल्या काळ्यांना स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या थापा मारल्या आहेत असें अजून एकदांसुद्धां घडलें नाहीं. हजारों निरपराधी जीवांचे दररोज बळी घेणारें महायुद्ध माणसांनींच करावें ! तें काम सज्जन सर्पांना कधींच साधणार नाहीं. प्रेमाच्या भानगडीवरून किंवा अन्य कारणानें आम्ही कितीहि चिडलों तरी द्वंद्‌—युद्धापलीकडे आमची मजल कधींच जात नाहीं.

असें असून आमच्यापेक्षां शतपटींनीं दुष्ट असलेला मानव खोटया गोष्टी रचून शतकानुशतकें आमची निंदा करीत आला आहे. एक महामूर्ख संस्कृत कवि म्हणतो, ‘ सर्पाच्या डोक्यावर मणी असला म्हणून कांहीं त्याचा भयंकरपणा कमी होत नाहीं ! ’ ही मण्याची कल्पना मनुष्यानें आपल्या सोईसाठींच शोधून काढली आहे ! सोनें आणि रत्नें घेऊन आम्हां सापांना तीं काय चाटायचीं आहेत ? उन्हाळयाच्या दिवसांत सुंदर संधिप्रकाशांत मातींत लोळण्यांत जी मजा आहे तिची सर रत्नांच्या राशी सांभाळीत बसण्यांत मुळींच नाहीं आणि चुकून पुरून ठेवलेल्या द्रव्याचा संरक्षक म्हणून एखादा नाग पहारा करीत राहिला तरी त्यांतली एक मोहोर सुद्धां तो कधीं लांबवणार नाहीं ! उलट मनुष्यजातीकडे पहा—सोन्यासाठीं जीव घेतील आणि जीव देतील हे लोक ! डोक्यावर हिऱ्यामाणकांनीं भरलेल्या पाटया असूनही ज्यांचा भयंकरपणा कमी होत नाहीं अशा असंख्य व्यक्ति आजकाल मनुष्यरूपानेंच पृथ्वीवर वावरत आहेत !

मान्यवर सर्पराज,

मनुष्यजात करीत असलेल्या आमच्या असल्या बदनामीबद्दल बेअब्रूच्या फिर्यादी भरायच्या म्हटलें तर आम्हांला वायुभक्षण करायलासुद्धां वेळ मिळणार नाही ! पण ही माणसांची जात किती कृतघ्न आहे याविषयीं मात्र दोन शब्द लिहिल्यावांचून राहवत नाहीं आम्हांला. ‘ प्रकाश पाहिला कीं आमची समाधी

लागते, संगीत ऐकलें कीं आम्हीं नादलुब्ध होऊन डोलूं लागतों ! असल्या सौंदर्य-समाधींत कुणीं आमचा जीव घेतला तरी त्याची सुद्धां फिकीर करीत नाहीं आम्हीं ! ही उदात्तता मानवी कलावंतांत कुठें तरी आढळते का ? या जातींत क्वचित् निर्माण होणारे महात्मे इतरांना जीवनांतला प्रकाश दाखवितात. क्षणभर हे लोक त्या प्रकाशानें दिपून जातात. पण दुसऱ्याच क्षणीं त्या प्रकाशाकडे पाठ फिरवून कृष्णकृत्यें करण्याकरतां ते अंधाराचा आश्रय घेतात. मोठमोठे कवि यांना जीवनसंगीत ऐकवतात. पण त्यांतले सुंदर सूर आळवून जग सुखी करण्याऐवजीं हीं माणसें—

शूरवीर सर्पराज,

पत्र लांबत चाललें याची जाणीव आम्हांला आहे. पण दलितांच्या मुक्या अंतःकरणांना वाचा फुटली कीं काय बोलूं नि काय बोलूं नको असें त्यांना होऊन जातें ! हा मनुष्यप्राणी आमच्यापेक्षां किती मागासलेला आहे, याचें उदाहरण म्हणून एकच गोष्ट सांगतों. आम्ही आपल्या अंगावरली कात वेळोवेळीं फेंकून देतों. एका काळची कातडी असते ती आमची ! पण जुनें तें सोनें या वृत्तीनें तिला चिकटून राहण्याचा मोह आम्हांला कधींच अंध करीत नाहीं. हीं माणसें मात्र जुन्या निरुपयोगी गोष्टींना नेहमी कवटाळून बसतात. हे लोक तत्त्वासाठीं दमडी-सुद्धां देणार नाहींत. मग चमडीची गोष्ट हवी कशाला ? आणि पदोपदीं कातडी बचावण्याचा प्रयत्न करणाऱ्या या मनुष्यजातीकडून आंतड्याच्या त्यागाची अपेक्षा करणें हें तर महामूर्खपणाचें होईल !

अखिल सर्पभूषण महाराज,

आपल्या अभिनंदनाकरतां आम्ही समस्त महाराष्ट्रीय सर्प हें पत्र लिहित आहों. आपल्यावर असल्या पत्रांचा आणि तारांचा आजकाल वर्षाव होत असेल. आपली कामगिरीच तशी बहुमोल आहे !

प्राचीनकाळीं आस्तिक महर्षीनें जयमेजय राजाच्या सर्पसत्रांतून आपल्या जातीचें रक्षण केलें. तेव्हांपासून ऋषिमुनीबद्दल आपणां सर्वांना फार आदर वाटत आहे. या भरतभूमींत २५ वर्षापूर्वी महात्मा गांधी नांवाचा असाच एक तपस्वी ऋषि उदयाला आला. त्यानें अहिंसेचा मंत्र उच्चारला. हा ऋषि आस्तिकाचा

अवतार आहे अशी आम्हां सर्पांची श्रद्धा असल्यामुळें आम्हीं सर्वांनीं त्यांची शिकवणूक आचरणांत आणण्याची शिकस्त केली. अंगावर पाय पडला तरी साप माणसाला चावेनासे झाले, सर्पदंशानें होणाऱ्या मनुष्यांच्या मृत्यूंची संख्या भराभर कमी होऊं लागली. आम्हांला मोठा आनंद झाला. आमची ही नवी अहिंसावृत्ति लक्षांत घेऊन मनुष्यहि प्रेमानेंच आमच्याकडे पाहूं लागेल अशी आशा आम्हीं करूं लागलों. पण एवढें सौजन्य दाखविलें तर तो मनुष्य कसला? आम्ही पूर्वींप्रमाणें चावत नाहीं हें आमच्या दुर्बलतेचें लक्षण आहे अशी त्यानें आपली समजूत करून घेतली—त्यानें न चावणाऱ्या किंबहुना निर्विष असणाऱ्या सर्पांचा, आमच्या स्त्रियांचा आणि पिलांचासुद्धां संहार आरंभला. त्याच्या या अत्याचाराला कुणींतरी आळा घालणें अत्यंत आवश्यक होतें! लखनौला आपण हें काम केलें. त्यामुळें लखनौ ही यापुढें हिंदुस्थानांतल्या सर्व सर्पांची काशी होईल.

हे काम आपण केल्याबद्दल—सर्प अहिंसावादी झाले तरी त्यांचा कुणी अंत पाहूं लागला तर ते पूर्वींइतक्याच सफाईनें सूड घेऊं शकतात. हें सिद्ध केल्या-बद्दल—आम्ही आपलें मनःपूर्वक अभिनंदत करतों. आपल्या दंशानें जो मनुष्य मेला त्याच्या कुटुंबांतल्या मंडळीबद्दल यावेळीं सहानुभूति दाखविणें हें आमचें कर्तव्यच आहे. त्या कुटुंबासाठीं कुणीं फंड उभारल्यास त्याला आम्ही यथाशक्ति मदत करूं. इतकेंच नव्हे तर या उदाहरणावरून धडा घेऊन मनुष्यानें हिंसा सोडून दिली तर आम्हीहि अहिंसेचें परिपूर्ण पालन करण्याची प्रतिज्ञा करतों! मात्र माणसाला एवढी अक्कल अजून आली नसेल तर—'

पत्राचा कागद इथेंच संपला होता. त्याच्या पुढचा कागद बहुधा वाऱ्यावर उडून गेला. माझ्या मनाला त्या पत्राच्या अपुरेपणाची मोठी चुटपुट लागली. पत्राखालीं कुणा कुणाच्या सह्या असाव्यात हें जाणण्याची उत्सुकता लागून राहिली मला. पण चित्रपट मधेंच तुटावा तसें तें पत्र—' तर आम्हीहि अहिंसेचें परिपूर्ण पालन करण्याची प्रतिज्ञा करतों! मात्र माणसाला एवढी अक्कल अजून आली नसेल तर—' या सब्दांपाशीं थांबलें होतें. मी स्वतःशींच म्हणालों—पुढें काय करण्याचा या सर्पांचा विचार असावा?

सळसळ असा एकदम आवाज झाला. लखनौकडे जाणाऱ्या ज्या महाराष्ट्रीय सर्पदूताच्या हातून हे कागद हरवले असतील तो ते शोधीत शोधीत आपल्या घरांत

तर शिरला नाहीं ना ? या भयंकर शंकेनें मी घाबरून गेलों. मी जागेवरून उठून पळण्याचा प्रयत्न करीत होतों. इतक्यांत—

एकदम खण्खण् असा मोठा आवाज झाला.

• • •

मीं डोळे उघडून पाहिलें. उठण्याच्या गडबडींत माझा हात पलंगाच्या दांडीवर आपटून तिचा खण्खण् असा आवाज झाला होता.

मी कावऱ्याबावऱ्या नजरेनें इकडेतिकडे पाहिलें. सापबिप कुठेंच दिसत नव्हता. मात्र माझ्या उशा लगत दिवा प्रकाशत होता. त्याच्याजवळच एक वर्तमानपत्र पडलें होतें. त्या वर्तमानपत्रांत माझ्या आवडत्या चित्रपटाची जाहिरात चमकत होती. आणि त्या जाहिरातीखालींच एक विलक्षण बातमी संपादकांनीं छापली होती—

' लखनौ येथें रामभरोसे नांवाच्या माणसानें एका नागिणीला ठार मारलें व नंतर नाग आपला सूड घेईल या भीतीनें झोंपण्याच्या जागेपासून विरुद्ध दिशेनें नागिणीच्या रक्ताची धार लावून ठेवून मोठ्या हुशारीनें तो दुसरीकडे जाऊन झोंपला. पण जणुं उपजत बुद्धीनें सर्पराजानें नेमकें त्याच ठिकाणीं जाऊन एकाच दंशांत त्याला ठार मारलें व आपल्या प्रियकरणीच्या मारेकऱ्याचा सूड घेतला ! '

# विसरलेला संदेश ९

' कृष्ण, आम्हांला कृष्ण हवा ! ' अवीनें मागणी केली.

' अंबाबाईच्या देवळाजवळ मिळतो तो ! ' मंदानें त्याच्या मागणीला पुष्टि दिली !

' मलाही कृष्ण हवा ! ' लता ओरडली.

' मला सुद्धां छान् छान् किस्न हवा ! ' सुलभा म्हणाली.

मी शांतपणानें ऐकत राहिलों. स्वातंत्र्याची मागणी करणाऱ्या राष्ट्रांप्रमाणें खाऊ-

खेळण्यांचा हट्ट धरणाऱ्या मुलांच्याही अंगांत विचित्र वारें भरलेलें असतें. अर्थात् त्यांना कह्यांत ठेवण्याकरतां आईबापांना मधून मधून साम्राज्यशाहीचें सोंग आणल्याशिवाय गत्यंतरच उरत नाहीं !

पूर्ण स्वातंत्र्य मागणाऱ्या राष्ट्राला कसले तरी फुसके हक्क देऊन फसविण्याची साम्राज्यशाही मुत्सद्यांची नीतिच असते. तिचें अनुकरण करीत मी म्हणालों, ' चौघांना मिळून एक कृष्ण आणूं या आपण ! '

अवीनें नाक मुरडलें.

मंदा ' ऊं: ! ' म्हणाली.

लता ' मला नको बाई अवीचा कृष्ण ' असें म्हणून फुरंगटून बसली.

आणि सुलभा ? तिचा जप सुरूच होता —' मला सुद्धां छान छान किस्न हवा '

साम्राज्य सरकार आपल्या प्रजेचे आईबाप म्हणवून घेत असलें तरी व्यवहारांत त्याची वागणूक सावत्र आईसारखी किंवा दत्तक बापासारखीच असते. परक्या सरकारला जसें आईबापाचें सोंग साधत नाहीं, त्याप्रमाणें खऱ्या आईबापांनाही कट्टर आणि कठोर अशा परक्या राजसत्तेची नक्कल फार वेळ साधत नाहीं, त्यामुळे मी लवकरच विरघळलों. आणि चौघांना चार कृष्ण घेऊन द्यायचें कबूल केलें. ते विकत घेतांना आपण उगीच मातींत पैसा घालतोंय असें मला वाटत होतें. नाहीं असें नाहीं. पण प्रत्येकाला स्वतंत्र कृष्ण मिळतांच त्यांच्या मुद्रांवर जो आनंद फुलला तो पाहून एका क्षणांत माझे पैसे दामदुपटीने वसूल झाल्यासारखें वाटलें मला. त्या चौघांच्या चेहऱ्यांकडे पाहतां पाहतां मला वाटलें—मनुष्याची गरिबी श्रीमंती त्याच्या कापड्यालत्त्यांवरून किंवा दागदागिन्यांवरून ठरविणारे लोक महामूर्ख असले पाहिजेत ! अनुपम आनंदाचे क्षण ज्याच्या आयुष्यांत अधिक येतात तोच खरा श्रीमंत—तोच नवकोटनारायण—तोच कुबेर.

घरीं परत येतांना प्रत्येक जण आपापल्या कृष्णाचें विलक्षण कौतुक करीत होता, स्वतःचें कौतुक करतां करतां दुसऱ्याची निंदा करण्याची मोठ्या माणसांची कला चिमुकल्या मुलांना साध्य झालेली नसते. त्यामुळें पुढें बडा पुढारी किंवा मोठा साहित्यिक होण्याचीं चिन्हें त्यांच्यांत दिसत नसलीं तरी त्यांची बडबड ऐकणाराला गोड वाटते.

सुलभा आपल्या हातांतल्या कृष्णाची गाय आपल्याला चावत नाहीं म्हणून तिचें

कौतुक करीत होती. लताचा कृष्ण मुरली वाजवीत असल्यामुळें ती पुनः पुन्हां त्याला आपल्या कानाशीं नेऊन पाहत होती. मंदाचा कृष्ण चोरून लोणी खात होता. कृष्णासारख्या देवानें चोऱ्या केल्या असतांना आपल्या पुस्तकांत ‘ चोरी कधीं करूं नये ’ असें कां लिहिलें आहे याविषयीं ती बहुधा गहन विचार करीत असावी ! अवीचा कृष्ण अर्जुनाला भगवद्‌गीता सांगत होता. घोडे हांकण्याचें काम करतां करतां एवढी विद्वत्ता प्रगट करणें अशक्य आहे, अशी अनेक टांगे-वाल्यांच्या अनुभवावरून त्याची खात्री झाली होती. त्यामुळें आपल्या हातांतल्या चित्राकडे तो जरासा अविश्वासानेंच पहात होता.

नव्याचें नवेंपण औट घटका कां होईना टिकविण्याचा प्रयत्न मोठीं माणसेंसुद्धां करीत असतात. मग तें नवें पुस्तक असो, नवें वस्त्र असो किंवा नवी सूनबाई असो. लहान मुलांना तर नवी वस्तु कुठें ठेवूं नि कुठें ठेवूं नको असें होतें. उद्यां सकाळीं सुलभा आपल्या गायीचें शेंपूट ओढून पाहणार याविषयीं माझी पूर्ण खात्री होती. पण आतां घरांत पाऊल टाकतांच ती म्हणाली, ‘ माझा किस्न फळीवर ठेवा ! ’

हट्ट आणि डांग्या खोकला यांच्याप्रमाणें सभ्यपणाची सांथहि लहान मुलांत लवकर पसरते. सुलभानें आपला कृष्ण देतांच बाकीच्या मुलींनींहि आपापले कृष्ण फळीवर ठेवण्यासाठीं माझ्याकडे दिले. शिवाजीपासून चारमिनारपर्यंतच्या अनेक चित्रांनीं गजबजलेल्या त्या फळीवर ते चौघे कृष्ण कसेबसे विराजमान झाले.

● ● ●

मध्यरात्रीं मीं या कुशीवरून त्या कुशीवर वळतां वळतां डोळे उघडून सहज त्या फळीकडे पाहिलें.

माझ्या मनांत आलें, आज गोकुळअष्टमी.

अष्टमीच्या या मध्यरात्रीं माझें मन शतकामागून शतकें मागें टाकीत एका क्षणांत कंसाच्या कारकीर्दींतल्या मथुरेच्या तुरुंगांत जाऊन उभें राहिलें.

कृष्णजन्माचा तो अद्‌भुतरम्य क्षण माझ्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभा राहिला.

कारागृहांतल्या एका कोठडींत देवकी प्रसूत झाली होती.

बाहेर पाऊस कोसळत होता. देवकी मातेच्या डोळ्यांतून अश्रु वाहत होते.

राजभगिनी असूनहि तिच्यावर तुरुंगांतल्या एका कोपऱ्यांत प्रसूत व्हायची पाळी आली होती. एरवीं तिच्या प्रसूतिवेदना कमी व्हाव्यात म्हणून राजवाड्यांत केवढी धांवपळ झाली असती ! पण आज कारागृहांतल्या भयाण एकांतांत हूं कीं चूं सुद्धां करायची तिला चोरी होती. काय नेम सांगावा ? भिंतीलासुद्धां कान असतात ! कंसाच्या कानांवर जर तिचा एक विकल उद्गार गेला तर तिच्या आशेचा हा शेवटचा अंकुर-सात पोटचे गोळे डोळ्यांदेखत मारले गेलेले बघून ज्याच्या भविष्याविषयीं तिचें मन अतिशय हळवें होऊन गेलें होतें तो तिचा हा आठवा पुत्र- हां हां म्हणतां जगांतून नाहींसा करण्यांत आला असता !

पण मातेचें प्रेम कुठलेंही दिव्य करूं शकतें हेंच खरें ! ओंठ घट्ट मिटून, अगदीं साधा दुःखाचा उद्गारसुद्धां तोंडाबाहेर पडूं न देतां देवकी प्रसूत झाली. प्रसूतीच्या त्या क्षणिक गुंगींत तिला वाटलें—आपल्याला पुत्र झाला म्हणून सारी नगरी महोत्सव करीत आहे. बाहेर मंगलवाद्यें वाजत आहेत. सुवासिनी आरत्या ओंवाळीत आहेत. दूरदूरच्या खेड्याहून पाणी घेऊन आलेल्या शेतकऱ्यांच्या बायका—

पण छेः ! तो नुसता भास होता. आकाशांत काळेकुट्ट मेघ गडगडत होते. सुवासिनींच्या आरत्यांचा भासणारा प्रकाश विजांच्या चमकाऱ्यांचा होता. शेतकऱ्यांच्या बायका देवकीच्या बाळाकरितां पाणी घेऊन तुरुंगांत कशा येणार ? बाहेर फक्त मुसळधार वृष्टि होत होती.

विजेच्या क्षणिक प्रकाशांत देवकीनें आपल्या बाळाचें मुख न्याहाळून पाहिलें. पुन्हां तें आपल्याला कधीं पहायला मिळेल याची तिला कल्पनाच करतां येत नव्हती. पण त्या बालजीवाच्या संरक्षणासाठीं त्याला तत्काळ तुरुंगाबाहेर पाठविणें आवश्यक होतें. घटकाभर कां होईना त्या चिमुकल्या जीवाला पोटाशीं घट्ट धरावें असा देवकीला मोह झाला. पण मोहाच्या पोटींच नाशाचीं बीजें असतात हें ती विसरली नव्हती. उद्यां मोठा झाल्यावर बाळ आपल्याला ओळखील कीं नाहीं, आपल्याला पाहिल्याबरोबर 'आई, आई' म्हणून हांक मारीत तो आपल्याला मिठी मारायला धांवून येईल का, एक ना दोन अनेक कातर कुशंका तिच्या मनांत क्षणार्धांत उभ्या राहिल्या. पण—

वसुदेव घाई करीत होता. तिनें तो दीड वितीचा नाजुक देह त्याच्या हातांत

दिला. तिचे अश्रू बाळाच्या मुखावर पडले, ती मनांत म्हणाली—' बाळा, हेंच तुझं पहिलं आणि शेवटचं दुग्धपान. '

वसुदेव गोकुळाला जायला निघाला.

विक्राळ रात्र ओरडत होती, आकांडतांडव करीत होती. पण दैव वसुदेवाला साथ देत होतें. त्या बालजीवाच्या पायाच्या ओझरत्या स्पर्शानें तुरुंगाचीं कुलपें गळून पडलीं. दुथडी भरून वाहणारी यमुना दुभंग झाली—

माझें मन मथुरेंतून परत आलें. माजघरांतल्या फळीवर ठेवलेल्या त्या चार कृष्णांकडे पाहतां पाहतां तें म्हणालें, ' कृष्णचरित्र किती विलक्षण आहे! जन्मतःच शृंखला तोडून कारागृहाबाहेर पडण्याचें हें अद्भुतरम्य दृश्य दुसऱ्या कुठल्याहि महापुरुषाच्या चरित्रांत आढळायचें नाहीं. '

विचार करतां करतां माझा डोळा केव्हां लागला तें मला कळलेंच नाहीं! मी पुन्हां जागा झालों तों कुणाच्या तरी स्पर्शानें. मला वाटलें मुलांपैकीं कुणीतरी पाणी पिण्याकरितां उठलें असावें. मीं डोळे उघडून पाहिलें. पलीकडे मंद निळसर प्रकाशांत झोंपलेलीं मुलें माझ्या दृष्टीला पडलीं. मग मला स्पर्श कुणीं केला?

माझें अंग शहारलें. फलज्योतिष आणि भुतंखेतं यांच्यावर मनुष्याचा विश्वास नसला तरी आयुष्यांत कांहीं कांहीं क्षण असे येतात कीं त्यावेळीं असल्या गोष्टी माणसाला खऱ्या वाटूं लागतात.

माझ्या उशाशीं कुणीतरी बसलें होतें. मी खडबडून उठलों. त्या आकृतीकडे मीं निरखून पाहिलें. भगवान् श्रीकृष्णाशीं विलक्षण साम्य होतें तिचें. मी नम्रतेनें म्हणालों ' भगवान् '

ती आकृति उद्गारली ' हें पहा, मला उपचार बिलकुल आवडत नाहींत. उठल्या सुटल्या तोंडाचा चंबू करून ' थँक्यू ' म्हणण्याची ही तुमची अलीकडची पद्धत आहे ना? ' भगवान् ' ही तशीच एक जुनी भानगड आहे. श्रीकृष्ण नांवाचा मी तुझा एक बाळमित्र आहे असें समजून माझ्याशीं बोल. '

काय बोलावें तेंच मला कळेना. पण कांहींतरी बोलायला हवें होतें.

मीं विचारलें, ' आज गोकुळअष्टमी म्हणून पृथ्वीवर—'

' छेः! तसें कांहीं नाहीं. वरचेवर पृथ्वीवर येतों मी! लहानपणापासून

भटकायचा मोठा नाद आहे मला! त्यामुळें स्वर्गातलें तें वैठें आयुष्य अगदीं अळणी वाटतें. म्हणून मधून मधून—'

'थँक्यू' ची माहिती भगवानांना कशी झाली हें कोडें आतां मला उलगडलें.

पुन्हां काय बोलायचें तें मला कळेना. पण वेळ मारून नेण्याकरितां मी म्हणालों, 'आपल्या गीतेवर अजून ग्रंथ रचेले जात आहेत–नित्य प्रवचनं होताहेत!'

कपाळाला आठी घालून श्रीकृष्ण म्हणाले, 'त्या प्रवचनांची गोष्ट सांगूं नकोस मला. एका विद्वानाच्या प्रवचनाला मी स्वतःच हजर होतों! 'ततो युद्धाय युज्यस्व' या अर्ध्या चरणावर दोन तास धबधबा वाहत होता नुसता! पण प्रवचनाच्या शेवटीं 'साप, साप' म्हणून कुणीतरी ओरडलें आणि त्या प्रवचन-कारानें जो सूंबाल्या ठोकला—'

गीतेचा विषय हा गप्पा मारायला चांगला होता! पण श्रीकृष्णांनींच तो असा बंद केला!

पुन्हां डोकें खाजवून मी म्हणालों, 'आपल्या चरित्राइतके दुसऱ्या कुणाच्याच जीवनावर बोलपट झालेले नाहींत!'

'म्हणजे माझ्याइतकी दुसऱ्या कुणाचीच बदनामी झाली नाहीं असं स्पष्ट म्हण ना!'

'बदनामी?' स्वारीच्या बोलण्याचा रोख लक्षांत आला होता तरी मीं मुद्दामच प्रश्न केला.

'हो बदनामी! आम्हा देवांना बदनामीच्या फिर्यादी करतां येत नाहींत म्हणूनच हे चित्रपटवाले असे शेफारले आहेत! कुठलाही संतपट घ्या, त्यांत भक्ताचा बॉडीगार्ड म्हणून माझी आपली कायमची नेमणूक झालेली दिसते. रुक्मिणी आणि सत्यभामा हे तमाशे पहायला पृथ्वीवर येत नाहींत म्हणून बरें! पण असला एखादा चित्रपट जर त्यांच्या दृष्टीला पडला तर इतक्या नालायक नवऱ्याबरोबर नांदण्याची आमची इच्छा नाहीं, असें सांगून मला सोडून त्या निघून जातील!'

श्रीकृष्ण विनोदी म्हणून पुराणांत प्रसिद्धच आहे. त्यामुळें स्वारी हें सारें विनोदानेंच बोलत आहे असें मला आतांपर्यंत वाटत होतें. पण भगवंताच्या मुद्रेवरली ती विषादाची छाया पाहून माझा तर्क साफ चुकला अशी माझी खात्री झाली. मनुष्यानें देवाचें समाधान करायचा हा उलटा प्रसंग आलेला पाहून—

श्रीकृष्ण पुढें बोलूं लागले ' तूं भक्तराज चित्रपट पाहिलाच असशील. '

' पाहिलाय् देवा ! त्यांत पागनीस आहेत, वासंती आहे, नि घंटाकर्णही आहे ! इथं सतरावा कीं अठरावा आठवडा सुरू आहे त्याचा ! थोडा थोडा रंगीतसुद्धां केलाय तो ! '

माझ्या बोलण्याकडे श्रीकृष्णाचें लक्षच नव्हतें. ते रागानें म्हणाले ' त्या अंब-रीषाच्या भावाच्या महालांत देव जातो नि कशा माकडचेष्टा करतो हें—'

' ती तुळशीदासांतल्या मारुतीच्या चेष्टांची नक्कल आहे देवा ! पण लोक खूप हंसतात तें पाहून ! '

' त्याचाच मला इतका राग येतोय् ! लोक नेहमींच लहान मुलांसारखे असतात. त्यांना हंसवायला फारशी अक्कल लागते असें नाहीं. पण अशा निर्बुद्ध रीतीनें लोकांना हंसविणं म्हणजे त्यांना फसविणं आहे ! '

मला या वाक्याचा अर्थबोधच होईना. पण आज लोकांना कसली जरुरी असेल तर ती हास्याची आहे. हा अनेक जाड्याजुड्या पंडितांचा सिद्धांत द्वापार युगांतल्या श्रीकृष्णाच्या कानांपर्यंत कदाचित् पोंचला नसावा म्हणून मीं म्हटलें ' हंसण्यानं प्रकृति सुधारते असा आमच्या कांहीं विद्वानांचा सिद्धांत आहे. कांहीं कांहीं लोक, हंसून हंसून लठ्ठ होतात म्हणे—'

' आणि मठ्ठ सुद्धां ! '

ही वरेरकरी कोटि ऐकून शांत होण्याकरतां दहा अंक मोजण्याची सूचना आतां देवाला केलीच पाहिजे अशी माझी खात्री झाली. चांचरत चांचरत मी कांहीं तरी बोलणार तोंच श्रीकृष्ण उद्गारले ' हें पहा, जगांत लठ्ठ लोक पुष्कळ आहेत आणि हडकुळेही रगड आहेत ! माझ्या वेळेला सुद्धां भीम आणि सुदाम होतेच कीं ! '

माझ्या तोंडांतून शब्द गेले, ' खरंच ! त्या काळांत पुष्कळ मोठमोठीं माणसं होऊन गेलीं. पण चिरकाल टिकणारा संदेश जर कुणीं दिला असेल तर, भगवान्, तो आपणच ! अहाहा ! काय वाक्यं आहेत आपलीं एकेक—' कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन, ' ' हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्—'

स्तुतीला देवसुद्धां भुलतो असें मी ऐकत आलों होतों. पण आतां मला अनुभव

आला तो अगदीं निराळा ! श्रीकृष्ण चिडखोरपणानें म्हणाले, ' बंद कर तुझी ही बडबड ! '

गीतेंतले श्लोक ही बडबड ?

माझ्यापुढें बसलेला श्रीकृष्ण खरा नसून त्याचा कुणीतरी तोतया असला पाहिजे अशी माझी खात्री झाली. मी त्याच्याकडे निरखून पाहूं लागलों. त्याची मुद्रा विचारगंभीर झाली होती. एकदम त्यानं माझा हात आपल्या हातांत घेतला व तो म्हणाला, ' हें पहा मनांतलं दुःख कुणाला तरी सांगितल्याशिवाय चैनच पडत नाहीं माणसाला ! '

मी मनात म्हटलें, ' श्रीकृष्ण आणि दुःख ! छान ! ते गोकुळांतले दुधदहीं, त्या सोळा हजार एकशें आठ बायका, ती सोन्याची द्वारका—'

श्रीकृष्ण पुढें बोलूं लागले, ' हे नवे चित्रपटवाले नि ते जुने हरिदास या दोघांनीं माझी पुरीपुरी बदनामी करून टाकली आहे. तुझ्या मुलांनीं आणलेलीं हीं फळीवरलीं चित्रं पहा, हीं मातीचीं चित्रं तयार करणारा एवढीच पडद्यावरलीं चित्रं तयार करणारांची बुद्धि आहे ! आणि पडद्यावर भिकार चित्रें नाचवून स्वतःला कलावंत म्हणून घेणाऱ्या पोटभरू बाजारबुणग्याइतकेच गीताजयंती दिवशीं माझ्यावर प्रवचनें झोडणारे लोक विद्वान् आहेत ! पहा—हीं चित्रं पहा. हे पहिलं चित्र गोरक्षण फंडाची जाहिरात म्हणून उत्तम आहे. पण कृष्ण हा आपल्या काळांतला उत्तम गुराखी आणि गवळी होता, यापेक्षां मुलांना तें दुसरें काय शिकवूं शकणार ? हें दुसरें चित्र ! हें पाहिलें कीं मुलें अभ्यास सोडून सिनेमांतलीं गाणीं म्हणत बसतील ! जन्माला येऊन मीं मुरली वाजविण्याखेरीज दुसरा धंदाच केला नाहीं अशी या लोकांची समजूत आहे कीं काय कुणाला ठाऊक ! एखादा संशोधक त्यावेळच्या एका चित्रपटकंपनींत कुठल्यातरी खांसाहेबांच्या हाताखालीं मी क्लारोनेट वाजवीत होतों असें अजून सिद्ध करीत नाहीं हें माझें सुदैवच म्हटलें पाहिजे ! '

स्वारी क्षणभर गप्प बसली. ओढ्याला येणाऱ्या लोंढ्याप्रमाणें राग आणि दुःख यांचा ओघ वाहूं देणेंच इष्ट असतें हें लक्षांत आणून मी स्वस्थ बसलों.

श्रीकृष्ण फळीवरल्या त्या चित्राकडे पहात म्हणाला, ' हें तिसरें चित्र ! हें पाहिलं कीं लहानपणीं मला रेफमेंटरींतच हवं होतं असं वाटूं लागतं !

दहींदुधाच्या कां होईना दररोज चोऱ्या करण्याखेरीज ज्या मुलाला दुसरं कांहीं सुचत नव्हतं—'

मी मधेच म्हणालों, 'या चवथ्या चित्रांत तुमच्या चरित्राचा खराखुरा संदेश प्रतिबिंबीत झाला आहे!'

श्रीकृष्णानें नकारार्थी मान हलविली. मीं चकित झालों. कर्तव्यविन्मुख होणाऱ्या अर्जुनाला कर्मयोगाचें स्वरूप विशद करून सांगणारें तत्त्वज्ञान ज्या चित्रांतून व्यक्त होत होतें तें चित्रसुद्धां—

श्रीकृष्ण एक सुस्कारा सोडून उद्गारला, 'गीता हा माझ्या आयुष्याचा खराखुरा संदेश नाहीं. तो संदेश निराळाच आहे. पण तें सांगणारं चित्र माती, पोथी आणि फिल्म यांच्याशीं पोटभरूपणानं खेळत बसणाऱ्यांच्या हातून निर्माण होणार नाहीं. माझ्या आयुष्यांतला खराखुरा संदेश एकच आहे—अन्यायाशीं लढा. जुलमाशीं लढा. प्राण पणाला लावून लढा. राज्याच्या लोभानं किंवा स्वर्गाच्या आशेनं लढूं नका! ज्योतीचा जन्म जसा अंधार उजळण्याकरतां असतो, त्याप्रमाणें व्यक्तीचा जन्म हें जग अधिक पवित्र, अधिक मंगल, अधिक उदात्त करण्याकरतां आहे. म्हणून जगांत जें जें अपवित्र असेल, जें जें अमंगल असेल, जें जें अनुदात्त असेल तें तें नाहींसं करण्याकरतां लढत राहणं, पराजय झाला तरी लढत राहण, प्रसंगीं, गुप्तपणानं—प्रसंगीं उघड, जरूर लागेल तेव्हां शस्त्रानं—जरूर लागेल तेव्हां बुद्धीनं, पण एकसारखं जगांतल्या राक्षसी शक्तीशीं लढत राहणं हेंच माझं जीवित-कर्तव्य होतं. गोकुळांत दहींदूध खाऊन आणि यमुनेच्या वाळवंटांत कुस्त्या करून मीं शक्ति कमाविली ती तरुण गोपींचे पदर ओढण्याकरतां नाहीं; तर कंसाच्या जुलमी राजसत्तेला सिंहासनावरून खालीं ओढण्याकरतां. वेळ आली तेव्हां मी उघडपणानं लढलों. पण साम्राज्याच्या राक्षसी लोभानं शेंकडों राजांना तुरुंगांत टाकणाऱ्या उन्मत्त जरासंधाला जिंकण्याची पाळी आली तेव्हां ब्राह्मणाचा वेष घेऊन मला यश मिळवावं लागलं! दैव माणसाला सुदैव अनुकूल असतंच असं नाहीं. कालयवन पाठलाग करूं लागला तेव्हां मला पळतां भुई थोडी झाली. पण जिथें शस्त्र पांगळें ठरतें तिथें बुद्धि चालूं लागते. मी गुहेंत झोंपलेल्या मुचकुंदाच्या पाठीमागं जाऊन लपलों. झोंपमोड झालेल्या मुचकुंदाच्या हातून कालयवन परस्पर मारला गेला. पुढें मीं शस्त्रसंन्यास केला. तोहि जगाला एक उदात्त दिसावा म्हणून! पण

भीष्माच्या हातून अर्जुन मारला जाणार अशी भीति वाटूं लागतांच मी माझी प्रतिज्ञा मोडून शस्त्र हातांत धरलं. प्रतिज्ञाभंग पुरवला, पण सत्पक्षाचा विजय झालाच पाहिजे अशी माझी त्यावेळची भूमिका होती. पण त्या प्रसंगाचं दृश्य कधीं कुणीं तयार केलं आहे का ? मला दुःख होतंय तें याच गोष्टीचं ! फळांतला गर टाकून त्याची साल चोखीत बसणाऱ्या वेड्याप्रमाणें सारे लोक माझ्या चरित्रांतल्या बाह्य गोष्टींचं चर्वितचर्वण करीत आहेत. पण त्याचा आत्मा—आत्मचरित्र लिहायची ही तुमची अलीकडची पद्धत माझ्यावेळीं असती तर फार बरं झालं असतं ! अजूनसुद्धां मी तो प्रयत्न—'

भगवान् श्रीकृष्ण आत्मचरित्र लिहिणार या कल्पनेनं आनंदित होऊन मीं डोळे मिटून घेतले. लेखक होण्यांत आपण फार मोठी चूक केली, आपण प्रकाशच व्हायला हवें होतें, या लढाईच्या धामधुमींत भिकार पुस्तकें काढणारे कांहीं गचाळ प्रकाशक जसे एकदम गबर झाले त्याप्रमाणें श्रीकृष्णाचें आत्मचरित्र छापून आपणहि घरावर सोन्याचीं कौलें घालूं असा विचार झटकन् माझ्या मनांत येऊन गेला. एका भाषेंत चित्रपट काढायचा असूनसुद्धां चित्रपटकंपन्या लेखकाकडून त्याच्या कथेचे जसे जागतिक हक्क घेतात त्याप्रमाणें श्रीकृष्णाकडून त्याच्या आत्मचरित्राचे पारलौकिकसुद्धां हक्क घ्यायचे आणि अपरात्र असली तरी करार आतांच्या आतां करून टाकायचा, म्हणून मीं डोळे उघडले.

पाहतों तों काय ? पलीकडे मुलें झोंपली आहेत आणि फळीवर ते चार मातीचे श्रीकृष्ण जिथल्या तिथें स्वस्थ बसले आहेत !

# अंधश्रद्धा

# १०

मीं डोळे उघडून पाहिलें. घड्याळांत साडेसात वाजले होते. मीं उठून खिडकींतून बाहेर पाहिलें. नुक्तें कठें उजाडलंय् असा भास होत होता. सारें आभाळ काळवंडलें होतें. होळी विझल्यानंतर तिथल्या राखेच्या ढिगाला जशी अवकळा येते तशी पूर्वदिशा दिसत होती. सूर्याचा तर कुठें पत्ताच नव्हता ! माझ्या मनांत

आलें ही कुंद पावसाळी हवा पाहून भगवान सूर्यनारायणही आपल्या अंथरुणांत डोळ्यावर गुडुप पांघरूण घेऊन निजून राहिला असावा !

या विचित्र कल्पनेचें माझें मलाच हंसूं आलें. मनुष्य आपल्यावरून जगाची परीक्षा करण्याचा मूर्खपणा नेहमीं करतो. त्यांतलाच प्रकार होता हा ! चुलीच्या उबेत अंगाचें गाठोडें करून निजणाऱ्या मांजराच्या पिलाप्रमाणें अंगावर उबदार रग गुरफटून घेऊन अंथरुणांत लोळत पडण्याची इच्छा माझ्या मनांत पुनःपुन्हां डोकावून पहात होती. आणि तेवढ्यासाठीं मी प्रत्यक्ष सूर्यावर आळशीपणाचा आरोप करीत होतों !

मीं पुन्हां पूर्वेकडे पाहिलें. सूर्य अजून कुठंच दिसत नव्हता. पण पूर्वेच्या बाजूला प्रकाशाचे अंधुक अंधुक पट्टे सर्वत्र नाचत होते. जुलमी राजसत्तेपुढें बाह्यतः माघार घ्यावी लागली तरी गुप्त राहून आपलें तेजस्वी कार्य अखंड चालू ठेवणारे देशभक्त असतात ना ! त्यांचेंच अनुकरण आज सूर्य करीत आहे असा मला भास झाला.

पण खोलीच्या बाहेर येऊन रस्त्याकडे पाहतांच माझी ही सारी कल्पकता एका क्षणांत गारठली. किरकिर करणाऱ्या मुलाप्रमाणें रात्रभर पावसाची चिरचिर सुरू होती. त्या चिरचिरीनें रस्त्याला जें रमणीय स्वरूप प्राप्त झालें होतें त्याचें वर्णन करायला अच्छोद सरोवराचें सुंदर शब्दचित्र रेखाटणाऱ्या बाणाची प्रतिभासुद्धां धजली नसती ! ठिकठिकाणच्या खड्ड्यांत सांठलेलें तें गढूळ पाणी—चिखलाचा तो रबडा—एखादा सायकलवाला जातांच या रबडयाचे भोंवतालीं उडणारे सुरम्य तुषार—पायीं चालणाऱ्या माणसांना सावधपणा शिकविण्याकरतां निसर्गानें निरनिराळ्या ठिकाणीं निर्माण केलेल्या निसरडया जागा—

पावसाळ्यांत असल्या रस्त्यांवरून म्युनिसिपालिटीच्या सर्व सभासदांची दररोज सकाळीं धावण्याची शर्यत ठेवावी असा विचार माझ्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं !

आपलें फिरणेंबिरणें आज निकालांत निघालें अशा समजुतीनें चूळ भरून मी चहा घ्यायला गेलों. चहा पितां पितां कुठें तरी जवळच मंगलवाद्यें वाजत आहेत असें वाटलें. मुलें तर काय वाजत आहे हें पाहण्याकरतां बाहेर धांवतच गेलीं. कुणाचें तरी लग्नबिग्न असेल असें पहिल्यांदा माझ्या मनांत आलें. पण श्रावणांतल्या मंगळवारीं रजिस्ट्रारच्या कचेरींत लग्नें लागत असलीं तरी वाजत गाजत

जाणारीं जुन्या पद्धतीचीं लग्नें चातुर्मासांत होणें शक्य नाहीं हें लगेच माझ्या लक्षांत आलें. सिनेमाच्या जाहिरातीपासून लग्नाच्या मिरवणुकीपर्यंत सर्व प्रसंगीं हल्लीं तींच मंगलवाद्यें आणि ' मावनके नजारे है ' वगैरे तींच तींच गाणीं वाजविलीं जातात ! तेव्हां एवढें वाजत गाजत रस्त्यावरून काय प्रकरण चाललें आहे तें पहावें म्हणून मीही चहा झटपट संपवून गच्चींत आलों.

आमच्या घरासमोरच जें दृश्य दिसलें त्यानें मी आजहि चकित होऊन गेलों. भोंवतालच्या सर्व घरांतलीं माणसें तो देखावा पाहण्याकरतां आपापल्या दारांत जमलीं होतीं. मोठ्या कौतुकानें तीं रस्त्यांतल्या दृश्याकडे बघत होतीं. कांहींतरी दिव्य, पवित्र, आणि उदात्त प्रसंग आपल्या डोळ्यांपुढें घडत आहे असा त्यांच्या मुद्रांवरून भास होत होता.

तें उदात्त दृश्य म्हणजे रस्त्यावरून लोटांगण घालीत जाणारी एक बाई होती. मध्यम वयाची ती मराठ्याची बाई पाण्याची, चिखलाची किंवा खड्डयांची पर्वा न करतां हात जोडून रस्त्यावर साष्टांग नमस्कार घालीत होती. पुन्हां भक्तिभावानें उठत होती आणि पुन्हां हात जोडून रस्त्यावर लोटांगण घालीत होती. असें लोटांगण घालीत जाण्याचा तिनें तीनचार मैलांवर असलेल्या एका देवीला नवस केला होता म्हणे ! कुस्ती जिंकणाऱ्या पहिलवानाप्रमाणें असा खडतर नवस बोलणाऱ्या बाईची मिरवणूक निघावी यांत नवल असें कांहींच नव्हतें ! पण—

माझ्या मनाला आंतून एकदम कांहींतरी टोंचूं लागलें,

कुठल्याहि वेडाचें समाजानें कौतुक करण्यांत मोठा धोका असतो. त्यामुळें त्या वेडावर लोकमान्यतेचा शिक्का बसतो. हां हां म्हणतां तें वेड आदर्श ठरतें. तसेंच वागायची नि त्याच मार्गानें जाऊन मोठेपण मिळवायची इच्छा अनेकांच्या मनांत आपोआप उत्पन्न होऊं लागते. शर्यतीचें अत्यंत घातक असें व्यसन आपल्या समाजांत गेल्या दहा वीस वर्षांत असेंच पसरलें नाहीं काय ?

माझें मन म्हणूं लागलें—घोड्यावर लावलेला पैसा आणि देवाला बोललेला नवस या दोन्ही गोष्टी एकाच लायकीच्या आहेत. शर्यतीच्या नादांत हजारों लोकांच्या संसाराची धूळधाण होत असली तरी योगायोगानें एखाद्याच्या घरावर सोन्याचीं कौलें चढतात. तीं कौलें जगाला दिसतात आणि भाजलेल्या खोबऱ्याच्या वासानें सांपळ्यांत उंदीर सांपडावेत त्याप्रमाणें माणसांमागून माणसें वैभवाच्या मोहानें व्यसनाच्या काळपिंजऱ्यांत अडकून पडतात !

देवावरली अंधश्रद्धा हा असाच एक विचित्र सामाजिक पिंजरा आहे. आजपर्यंत लाखों वांझ बायकांनीं मूल व्हावें म्हणून देवळाचे उंबरठे झिजविले असतील आणि पिंपळाचे पार गुळगुळीत केले असतील ! पण या बायकांपैकीं पुढें किती लेंकुरवाळ्या झाल्या हा हिशेब कधीं कुणीं ठेवला आहे का ! दगडी देवापुढें नाक घासून जर मुलें होत असतीं तर आजच्या दारिद्र्याच्या काळांत अधिक मुलें होऊं नयेत या इच्छेनें लाखों लोक मोठ्या आनंदानें आपलीं नाकें चपटीं—अगदीं चिनी किंवा जपानी घाटाचींसुद्धां करून घ्यायला एका पायावर तयार झाले असते !

ती बाई दंडवत घालीत घालीत खूप दूर गेली होती. अगदीं दिसेनाशी झाली होती ती आतां ! पण तिच्या त्या अंधश्रद्धेनें माझ्या मनांत निर्माण केलेलें वादळ कांहीं केल्या थांबेना. माझ्या मनांत आलें—तोंडांत पाणीसुद्धां न घालतां ही बाई तीनचार मैल अशीं लोटांगणें घालीत जाणार ! रस्त्यांत पायाला एखादा दगड लागला तरी आपण अस्वस्थ होतों. पण ही बाई दगडांतून, खड्यांतून शांतपणानें सारें शरीर लोळवीत तें देऊळ गांठणार. तिथें पोंचायला कदाचित् संध्याकाळसुद्धां होईल तिला. चहाला पांच मिनिटें उशीर झाला तर आपण बेचैन होतों. पण ही बाई संध्याकाळपर्यंत निग्रहानें उपाशी राहणार. तिच्या श्रद्धेची ही उत्कटता अलौकिक आहे. पण—

पण दुर्दैवानें ही श्रद्धा अंध आहे ! आज रशियांत ही बाई असती तर—आपल्या देशाचें स्वातंत्र्यरक्षण करण्याच्या कामीं तिच्या या लोकविलक्षण चिकाटीचा आणि उत्साहाचा किती उपयोग झाला असता ! पण ती हिंदुस्थानांतली बाई आहे. तिचा त्याग, तिचें धैर्य, तिची सहनशीलता, तिची श्रद्धा हे सारे सह्याद्रीवरून खालीं पडून रानावनांतून वाहत जाणाऱ्या जलप्रवाहाप्रमाणें फुकट जाणारे गुण आहेत. धरणें बांधून त्या जलप्रवाहांतून वीज निर्माण केली तर महाराष्ट्रांत कितीतरी नवेनवे कारखाने निघतील ! पण—पण लक्षांत कोण घेतो ?

हिंदुस्थानांत आढळणारी अंधश्रद्धा हीसुद्धा अशीच एक विलक्षण शक्ति आहे. आज तिचा भयंकर दुरुपयोग होत आहे ! पण पारतंत्र्याइतकाच अंधश्रद्धा हाहि व्यक्तीचा आणि राष्ट्राचा सर्वांत मोठा शत्रू असतो याची जाणीव जर बहुजन-समाजाला झाली—

या विचारापाशीं मी एकदम थांबलों. थांबावेंच लागलें मला ! माझें मन

अस्वस्थ झालें. मघाच्या त्या अशिक्षित बाईला हंसण्यांत काय अर्थ आहे. आमच्यांतलीं मोठमोठीं माणसेंसुद्धां अजून तिच्यासारखींच वागताहेत, हा विचार माझ्या मनांत आला. ज्या देशांत चित्रपटाचे निर्माते कथा किंवा अभिनय यांच्यांत लक्ष घालण्यापेक्षां ज्योतिषांना आपल्या पत्रिका दाखवीत बसतात तिथें कलेची प्रगति कशी होणार ? जिथें शिकल्यासवरलेल्या मुली दाखवायच्या आणि हुंडा घ्यायच्या क्रूर रूढीपुढें मुकाट्यानें मान लववीत आहेत तिथें प्रेमविवाह हा थट्टेचा विषय ठरावा यांत आश्चर्य कसलें ? कोहळा घ्यायची भाषा करायची आणि आवळासुद्धां द्यायचा नाहीं, हा साम्राज्यशाहीचा लोभी स्वभाव काय आमच्या पुढाऱ्यांना आज पहिल्यांदाच कळतोय ! पण अजूनहि गोडीगुलाबीनें आणि तडजोडीनें देशाला स्वातंत्र्य मिळवून देऊं पाहणारे मुत्सद्यांचे फड ठिक-ठिकाणीं दृष्टीस पडत आहेतच कीं !

कुठल्याहि क्षेत्रांत चला, जिथें तिथें आमच्या जीवनाच्या गाड्या अजून जुन्या चाकोऱ्यांतून जात आहेत, सारीं माणसें आंधळ्याच्या माळेप्रमाणें धडपडत अंध-श्रद्धेनें मार्ग क्रमीत आहेत ! प्रगतिपर आयुष्य हें नेहमींच एक प्रकारचें बंड असतें ! नवें जीवन हें क्रांतीवांचून कधींच निर्माण होत नाहीं आणि श्रद्धा ही कुठल्याही क्रांतीची वडील बहीण असली तरी अंधश्रद्धा ही तिची कट्टी वैरीण होते या गोष्टीकडे आमचें कांहीं केल्या अजून लक्षच जात नाहीं !

माझ्या मनांत एकदम आलें ती बाई आतां किती लांब गेली असेल बरें ? अर्धा फर्लांग—

आतां मला त्या बाईचें हंसूं आलें नाहीं—नुसती कींवही आली नाहीं. तिच्या विषयीं विचित्र प्रकारची सहानुभूति वाटूं लागली मला. ती बाई हें एक प्रतीक आहे असें मला वाटूं लागलें. तिच्या ठिकाणीं अंधश्रद्धांच्या शेंकडों शृंखलांनीं जखडलेल्या आणि त्यामुळें गुलामगिरींत खितपत पडलेल्या माझ्या मातृभूमीची मूर्ति मला दिसूं लागली !

# महात्म्यांचे अश्रू

# ११

माझ्या हातांतल्या वर्तमानपत्रांत नाना प्रकारच्या बातम्या फडकत होत्या. दुकानदार आपला माल आकर्षक करण्याकरतां त्याची विविध सुंदर रचना करतात ना ? दैनिकाच्या संपादकांनाहि दररोज आपल्या बातम्या अशाच सजवून मांडाव्या लागतात. अशा दृष्टि वेधून घेणाऱ्या सर्व वार्तांवरून मीं नजर फिरविली. कोहिमा नजीकची दोस्तांची सरशी, भरलेलें पिस्तुल चुकून उडाल्यामुळें सिंध-मधल्या एका मंत्र्याच्या पत्नीला आलेला मृत्यु, रॅशनिंग कार्ड न मिळाल्यामुळें पंढरपुरच्या विठोबावर अन्नाकरतां हायकोर्टांत जायची आलेली पाळी--दैनिक वृत्तपत्र म्हणजे नवरसांची धर्मशाळा असते या माझ्या एका मित्राच्या उक्तीचा अनुभव मी क्षणार्धात घेतला.

पण पुढच्याच क्षणीं मी या साऱ्या चित्रविचित्र बातम्या विसरून गेलों. माझे डोळे एका वाक्यावर खिळून राहिले. तीन साध्या शब्दांचें छोटें वाक्य होतें तें — ' मी सुखी नाहीं ! '

गमतीनें सहल करीत असतांना पायाला एकदम कांटा बोंचावा तसें झालें मला तें वाक्य वाचून. स्वत:साठीं जगणारीं जगांतलीं असंख्य माणसें हें वाक्य नेहमींच स्वगत उच्चारीत असतात. त्यांतलीं अनेक त्याचें वारंवार अवास्तव प्रदर्शनहि मांडतात ! या सर्व तक्रारखोरांना रामदासांनीं ' जगीं सर्व सुखी असा कोण आहे ! ' या एका चरणांत कायमचें उत्तर देऊन ठेवलें आहे. भोग भोगून मनुष्य कधींच तृप्त होत नाहीं; उलट उपभोगानें मनुष्य अधिक हांवरा आणि अधिक लंपट होत जातो, हा अनुभव महाभारतांतल्या ययाति राजाइतका जुना आहे. त्यामुळें ' मी सुखी नाहीं, ' हे कुणाचेहि शब्द वाचल्याबरोबर विरघळून जाण्याइतकें माझें मन कांहीं कच्चें किंवा काव्यमय राहिलेलें नाहीं ! पण—

ते शब्द तुमच्याआमच्यासारख्या एखाद्या सामान्य व्यक्तीचे नव्हते. एका

जगद्वंद्य विभूतीचे शब्द होते ते. ते शब्द धनासाठीं धडपडणाऱ्या एका विद्वानाचे किंवा कीर्तीसाठीं तडफडणाऱ्या एकाद्या कलावंताचे नव्हते! आपलें मरण हांसऱ्या डोळ्यांनीं पाहणाऱ्या एका संताचे शब्द होते ते. ते शब्द हळुवार मनाच्या आणि पुस्तकी ज्ञानाच्या एखाद्या विशींतल्या तरुणाचे नव्हते. पंचाहत्तर पावसाळे पाहिलेल्या कणखर मनाच्या तेजस्वी वृद्धाचे शब्द होते ते. स्वतःच्या संकुचित संसारांत सुख मिळविण्याकरितां धडपडून निराश झालेल्या एखाद्या दुर्दैवी जीवाचे शब्द नव्हते ते! ज्याच्या डोळ्यांत गंगेचें पावित्र्य आहे, ज्याच्या हृदयांत महासागराचें गांभीर्य आहे, ज्याच्या हृदयांत साऱ्या मंगल ध्येयांना धीर देण्याची शक्ति आहे अशा महात्म्याचे शब्द होते ते!

गांधीजींनीं अगदी अलीकडे जयकरांना लिहिलेल्या छोटया पत्रांतले ते तीन शब्द—त्या तीन शब्दांत त्रिभुवनातलें कारुण्य भरलें आहे असा मला भास झाला. 'मी सुखी नाहीं' असें स्वतः महात्माजीच म्हणत होते. तेव्हां या उद्गारांच्या खरेपणाविषयीं प्रश्नच नव्हता! ते करुण शब्द वाचून माझ्या डोळ्यापुढें एक कल्पनाचित्र उभें राहिलें.

गांधीजी विलक्षण संयमी आहेत हें खरें! पण अशा असुखी मनःस्थितींत त्यांना अंथरुणावर पडल्याबरोबर झोंप येत असेल का? छेः! तें शक्यच नाहीं. गांधीजी देवमाणूस असले तरी ते आधीं माणूस आहेत आणि मग देव आहेत. कस्तुरबांची शेवटची घटका जवळ आल्याचें ओळखल्यावर 'पेनसिलीनचें इंजेक्शन देऊन आपल्या आईला शेवटच्या क्षणीं उगीच त्रास कां देतोस?' असें ते देवदासांना म्हणाले. पण दुसरे दिवशीं बांचें शरीर जेव्हां आपल्या शेवटच्या यात्रेला निघालें, तेव्हां गांधीजींनीं पाणावलेल्या डोळ्यांनीं उद्गार काढले, 'तिला तिरडीवर बांधू नका. तशीच न्या!'

एवढे कणखर आणि एवढे हळुवार असलेले गांधीजी—'मी सुखी नाहीं' म्हणून पत्रांत मित्रापाशीं आपल्या हृदयांतली व्यथा व्यक्त करणारे गांधीजी रात्रीं झटकन् झोंपूं शकत असतील? छेः! त्यांनीं कितीहि मनोनिग्रह केला तरी त्यांच्या डोळ्यांपुढें आजची दीन दलित 'भारतमाता' उभी राहत असेल. तिच्याकडे पाहवत नाहीं म्हणून त्यांनीं डोळे मिटून घेतले तरी तिच्या पायांतल्या अधिक अधिक जड होत चाललेल्या शृंखलांच्या खळखळाटानें त्यांचा डोळा लागत नसेल.

अशा व्याकुळ मनःस्थितींत त्यांना नकळत त्यांच्या डोळ्यांतून दोन अश्रुबिंदुही त्यांच्या उशीवर पडत असतील ?

बोलून चालून हें कल्पनाचित्रच ! पण या काल्पनिक चित्रानें माझें मन अत्यंत अस्वस्थ करून टाकलें. मीं हातांतलें वर्तमानपत्र दूर फेंकून दिलें आणि गार वारा लागून जरा बरें वाटेल या आशेनें खिडकीपाशीं जाऊन उभा राहिलों. मीं बाहेर पाहिलें—एक तारा खळकन् तुटून पडला ! माझ्या मनांत आलें—स्वर्गांत अश्रु नसतात असें कवी आजपर्यंत सांगत आले. पण हे सारे कविलोक लबाड असतात ! हा तुटून पडलेला तारा—कुणातरी स्वर्गस्थ विभूतीचा अश्रुबिंदुच असावा तो ! कुणा महात्म्याचा अश्रु असेल बरें तो !

• • •

त्या मार्गदर्शक देवदूतामागून मी जात होतों, एका भव्य शुभ्र मंदिरापाशीं थांबून तो उद्गारला—' हें स्वर्गांतलं महात्म्यांचं निवासस्थान ! '

जणुं कांहीं जाईच्या फुलांनींच तें मंदिर बांधलें होतें ! किती सुंदर ! किती पवित्र ! मी झटकन् आंत गेलों. समोर मध्यभागीं बुद्धदेवाची धानस्थ आकृति दिसत होती. मी अगदीं जवळ जाऊन तिला अभिवादन केलें. बुद्धदेवांनीं डोळे उघडले., मी मनांत चरकलों. ते डोळे ओले दिसत होते. होय ! माझा तर्कच बरोबर होता. माझ्यासमोर त्यांनीं आपळे डोळे पुसले.

मीं नम्रपणानें प्रश्न केला, ' महाराज, एक शंका विचारूं ?

' अवश्य ' बुद्धदेव हंसत म्हणाले. पण तें हास्य मला कारुण्यपूर्ण वाटलें.

' आपण जगांतलं दुःख नाहींसं करण्याकरतां एका मध्यरात्रीं राजवैभवाचा, स्त्रीसुखाचा आणि पुत्रसुखाचा त्याग केलात. त्या विलक्षण क्षणींसुद्धां आपल्या डोळ्यांत एकहि अश्रु उभा राहिला नाहीं. आणि आज इतक्या वर्षांनीं—'

बुद्धदेव गंभीरपणानें उद्गारले, ' मीं स्वतःच्या संसाराचा त्याग केला तो जगाचा संसार सुखाचा व्हावा म्हणून. त्या आशेनं माझं मन त्यावेळीं फुलून गेलं होतं. आज ना उद्यां नवं सुखी जग निर्माण होईल असं मला वाटत होतं. पण ती आशा—तीं फुलं आतां कोमेजून गेलीं आहेत. माझ्या मूर्तीपुढं मस्तक नम्र करणारीं माणसं इतर माणसांचीं मस्तकं उडविण्यांत आज दंग होऊन गेलीं आहेत,

माझ्या अहिंसेच्या तत्त्वज्ञानाचा अभिमान बाळगणारीं माणसं जंगली जनावरा-प्रमाणें हिंस्र बनण्यांत सध्यां आनंद मानीत आहेत ! या गोष्टीचं मला विलक्षण दुःख होतंय ! हे अश्रू—छे ! अजून मी सुखी नाहीं ! '

बुद्धदेवांच्या डोळयांतल्या त्या अश्रुबिंदूंकडे मला पाहवेना. मीं दुसरीकडे दृष्टि वळविली. तिथें ख्रिस्ताची मूर्ति उभी होती. मी जवळ जाऊन तिला वंदन केलें. वधाच्या वेळीं छातीवर जुळविलेले ख्रिस्त देवांचे हात अजूनहि तसेच होते. मीं त्यांच्या डोळयांकडे पाहिलें. त्यांतून अश्रुबिंदू ओघळत होते.

मीं खालीं मान घालून विचारलें, " महाराज एक प्रश्न विचारूं ?

' विचार ' ख्रिस्तदेवांनीं उत्तर दिलें.

' हांसत हांसत वधस्तंभावर चढणाऱ्या आपल्यासारख्यांच्या डोळयांतले हे अश्रु पाहून—'

किंचित् हंसून ख्रिस्तदेव उद्गारले, ' या अश्रूंनीं तरी पृथ्वीवर पेटलेला वणवा विझतो किंवा काय हें पाहतोंय् मी ! दोन हजार वर्षापूर्वी वधस्तंभावर लटकतांना मला वाटलं—माझ्या रक्तानं जगांतलं सारं पाप धुवून जाईल, माणसाचं मन निर्मळ होईल. पण माझी पूजा करणारेच आज माझीं तत्त्वं पायाखालीं तुडविताहेत. एका गालावर कुणीं चापट मारली तर दुसरा गाल पुढं करा असा उपदेश मीं जन्मभर केला. पण माझे अनुयायी आज जगांत काय करताहेत ? ते कुणाच्याहि एका गालावर चापट मारून थांबत नाहींत ! त्याचा दुसरा गालहि तितकाच लाल होईल अशी काळजी ते घेत आहेत. ते एक देश गिळंकृत करून कधींच थांबत नाहींत. त्याच्या मागोमाग दुसरा देश आपला गुलाम कसा होईल याची दक्षता ते घेत आहेत. ' हिंसा करूं नका ' ही माझी पवित्र आज्ञा ! पण ख्रिश्चन म्हणविणाऱ्या—माझं नांव अभिमानानं घेणाऱ्या—जगांतल्या सर्व देशांत आज घडोघडीला मनुष्याच्या निष्पाप रक्ताच्या नद्या वाहत आहेत, त्याच्या पवित्र हाडामासांचे पर्वत रचले जात आहेत. ही स्थिति नाहींशी होईपर्यंत माझे अश्रु थांबणार नाहींत. स्वर्गात येऊन दोन हजार वर्षं झालीं मला ! पण अजून—अजून सुखी नाहीं मी !

मला वर मान करून ख्रिस्तदेवाकडे बघण्याचा धीर होईना. मी खालीं पहात पुढें चालूं लागलों. मधेंच जरा धीर करून मी उजव्या बाजूला पाहिलें. तिथें

माझ्या आवडत्या लेखकाची—टॉलस्टॉयची-स्वारी बसली होती. मी जरा निरखून पाहिलें. टॉलस्टॉयच्या डोळ्यांतही अश्रु दिसत होते. स्वारी स्वतःशींच कांहींतरी पुटपुटत होती. मी लक्ष देऊन ऐकूं लागलों–' एका माणसाला किती जमिनीची जरुरी आहे ? फक्त साडेतीन हात ! पण—पण—हें कधी कळणार या माणसांना ?' एवढे शब्द मला अगदीं स्पष्ट ऐकूं आले.

जड अंतःकरणानें आणि जड पावलांनीं मी पुढें चाललों. मधे सहज डावीकडे वळून पाहिलें. तुकाराम महाराज अभंग आळवीत बसलेले दिसले. पण—महाराजांच्या मुद्रेकडे दृष्टि जातांच माझे मन कंपित झालें. त्यांच्याही डोळ्यांतून अश्रुधारा वाहत होत्या. जगांतली रंजले गांजलेल्यांची संख्या कमी होण्याऐवजीं वाढतच आहे हे पाहून इंद्रायणीनें आपले अभंग उगीच तारले असें तर त्यांना वाटत नसेल ना !

कुणाला ठाऊक ! मला त्यांच्याकडे पाहण्याचा धीर होईना. मीं डोळे मिटून घेतले !

● ● ●

मीं डोळे उघडले तेव्हां दैनिकाचा तो अंक माझ्या अंथरुणाजवळच पडला होता. मी तो उचलला. माझें लक्ष गांधीजींच्या त्या छोट्या पत्राकडे गेलें. माझी दृष्टि त्या तीन शब्दावर पुन्हां खिळली–' मी सुखी नाहीं ! '

माझ्या मनांत आलें–नव्या सुखी जगाच्या पोकळ गप्पा आजकालचे मुत्सद्दी मारीत आहेत दररोज; पण जोंपर्यंत बुद्ध–ख्रिस्तांच्या डोळ्यांतून दुःखाचे अश्रू वाहत आहेत. तुकाराम-टॉलस्टॉय सारख्यांचे आत्मे आपला उपदेश पालथ्या घागरीवर पाण्यासारखा झाला म्हणून स्वर्गात तळमळत आहेत आणि गांधीजी-सारख्या धर्मराजाच्या मुखांतून ' मी सुखी नाही ' हे आर्त उद्गार बाहेर पडत आहेत, तोंपर्यंत नवें सुखी जग जन्माला येणार नाही ! त्या नव्या जगाचा जन्म–

गांधीजी धर्मराज असले तरी त्यांच्यासारख्या महात्म्यांनासुद्धां हें जग निर्माण करतां येणार नाहीं ! त्यांच्या डोळ्यांतून वाहणाऱ्या अश्रूंची किंमत ज्या दिवशीं जगांतल्या प्रत्येक सामान्य मनुष्याला कळेल, त्याच दिवशीं—

महाभारतांतल्या एका गोष्टीची आठवण झाली मला. विराट आणि धर्मराज

द्यूत खेळत असतांना रागावून विराटानें धर्माच्या तोंडावर फांसा मारला. धर्माच्या नाकांतून रक्त वाहूं लागलें. तें जमिनीवर पडूं नये म्हणून धर्मानें तें ओंजळींत धरलें. द्रौपदी जवळच उभी होती. तिनें लगबगीनें एक भांडें आणून त्यांत तें गळणारें रक्त धरलें. इतक्यांत बृहन्नडेसह उत्तर भेटायला आल्याची द्वारपाळानें वर्दी दिली. तेव्हां धर्म म्हणाला 'बृहन्नडेला आंत आणूं नका. युद्धावांचून इतर वेळीं जो माझ्या अंगांतून रक्त काढील त्याचा तत्काळ वध करायची अशी बृहन्नडेची प्रतिज्ञा आहे. हें रक्त त्याच्या दृष्टीला पडलं तर विराट प्राणाला मुकेल !'

धर्मराजाच्या त्या रक्तापेक्षां बुद्ध, ख्रिस्त आणि गांधी यांच्यासारख्या महात्म्यांच्या अश्रूंची किंमत कमी आहे असें कोण म्हणेल? रक्त हे शरीराचे अश्रू असले तर अश्रू हें आत्म्याचें रक्त आहे. अलौकिक महात्म्यांचें हें अमोल रक्त जमिनीवर पडूं नये म्हणून जोंपर्यंत जगांतल्या सर्व उदात्त शक्ती धांव घेत नाहींत, हें पवित्र रक्त काढणाऱ्याला शिक्षा केल्याशिवाय आम्ही राहणार नाहीं अशी प्रतिज्ञा करणारे अर्जुन जोपर्यंत प्रत्येक देशांत विपुल प्रमाणांत उत्पन्न होत नाहींत; तोंपर्यंत मुत्सद्यांची एक ठेवणींतली थाप किंवा कवींचें एक गोड स्वप्न यापलीकडे 'नवें जग' या शब्दप्रयोगाला कांहीं अर्थ नाहीं ! ज्या दिवशीं गांधीजींसारख्या महात्म्यांच्या डोळयांतून अश्रू येण्याऐवजीं त्यांच्या मुखांतून 'मी सुखी आहे' असे शब्द निघतील त्याच दिवशीं नव्या जगांतला पहिला सूर्य आपल्या पवित्र किरणानीं या पृथ्वीला प्रकाशित करील !

# गोष्ट जुनीच आहे ! १२

आरामखुर्चींत पडून चित्रविचित्र कल्पनातरंगांत रमून जाण्याचा विलक्षण नाद आहे मला ! अगदीं सुतानें स्वर्गाला जातों मी अशा वेळीं !

काल असेंच झालें. जर्मनीनें इंग्लंडवर निर्मनुष्य विमानें पाठविल्याचें मीं वृत्तपत्रांत वाचलें. आरामखुर्चींत पडल्या पडल्या मी स्वतःशीं म्हणालों—बिन कांट्याचा अननस ही आपल्या लहानपणीं मोठी अपूर्व चीज वाटायची लोकांना !

पण आतां बिन माणसांनीं चालणारीं विमानेंसुद्धां निघालीं. आजकाल हे सारे शास्त्रज्ञ मृत्यूचे जिगरदोस्त झाले आहेत. पण उद्यां उपरति होऊन ते मृत्यूचे कट्टर दुष्मन झाले तर ?

तर हां हां म्हणतां मनुष्याला अमर करण्याचें औषध ते शोधून काढतील. देवदैत्यांना ज्याच्यासाठीं समुद्र घुसळावा लागला त्या अमृताचा डोस उद्यां चार आण्याला बाजारांत मिळूं लागेल. मनुष्याला अमर करण्याच्या औषधानंतर त्याला पुन्हां लहान करण्याचें औषधहि ते शोधून काढतील ! त्यांत एवढें कठिण असें काय आहे ?

मी विचार करूं लागलों—अमर होण्याचें औषध आणि पुन्हां लहान होण्याचें औषध अशीं दोन औषधें जर उद्यां बाजारांत मिळू लागलीं तर आपण त्यांतलें कुठलें घ्यायचें ? कितीहि महाग असलें तरी आपण दुसरेंच औषध घेऊं. अमर होणें याचा अर्थ खूपखूप म्हातारे होणें असाच आहे. पण आकड्यांनीं मोजतां येणार नाहीं एवढी संपत्ति एखाद्यानें मिळविली तरी तेवढ्यावरून कांहीं तो जगांतला सर्वांत सुखी मनुष्य ठरत नाहीं ! कदाचित् तो पृथ्वीच्या पाठीवरला सर्वांत दुःखी मनुष्यहि असूं शकेल ! आयुष्याच्या संपत्तिचेंहि असेंच आहे. केवळ पावसाळ्यांची संख्या वाढली म्हणून कांहीं कुणाच्या आयुष्यांत अधिक पिकें निघत नाहींत ? उलट झाडाप्रमाणें माणसेंहि पुढें पुढें वठून जाण्याचाच अधिक संभव उत्पन्न होतो !

आणि म्हणूनच ज्या काळांत जीवनाच्या चिमुकल्या वेलीवर एकसारखा फुलोरा फुलत असतो तें लहानपणच मला नेहमीं आवडतें. साठीनंतरचें एक वर्ष घेऊन ब्रह्मदेव बाळपणांतला एक दिवस परत द्यायला तयार असेल तर हा सौदा करायला मी केव्हांहि एका पायावर तयार आहे. मला परत मिळणारा तो दिवस उन्हाळ्यांतला असला तर या फुलावरून त्या फुलावर चिमुकल्या विमानांप्रमाणें उडत जाणारीं चित्रविचित्र पंखांचीं रत्नें माणकें पाहून तीं धरण्याकरतां मी धांवत सुटेन, तो दिवस पावसाळ्यांतला असला तर माझ्या वडील भावाच्या अभ्यासाच्या वह्यांतले कागद हळूच वाचून काढून कुणाकडून तरी त्यांच्या छोट्या नावा मी करून घेईन नि घरासमोरून वाहणाऱ्या पाण्यांत दिवसभर त्या सोडीत बसेन आणि तो दिवस थंडीचा असला तर अगदीं पहांटे उठून शेजारच्या वेणूच्या आधीं

कोंपऱ्यावरल्या पारिजातकाचीं सारीं फुलें वेंचून आणून तिची अशी फजिती करीन कीं—

पुन्हां परत मिळणाऱ्या त्या एका दिवसांत आणखीही एक गोष्ट मी करणार आहे ! एक छोटी सुंदर वही विकत घेऊन तिच्यांत खूप खूप संदेश घेणार आहे मी ! गेल्या दहा बारा वर्षात संदेश देऊन देऊन अगदीं कंटाळलोंय् मी ! कुणालाही संदेश देतांना प्रत्येक वेळीं माझ्या मनांत येतें आपल्या लहानपणीं ही गंमत असती तर फार बरें झालें असतें ! माझे आजोबा बाबा काका मोठे संभाषणचतुर होते. त्यांच्या गप्पा रंगल्या नाहींत असें कधीं झालेंच नाहीं ! मधून मधून ते मोठे मार्मिक बोलत ! पण आतां त्यांचें उत्कृष्ट असें एकही वाक्य माझ्या संग्रहीं नाहीं. माझ्या लहानपणीं संदेशवह्या असत्या तर मी बाबा–काकांच्याकडून दररोज नवा नवा संदेश घेतला असता ! बाबा–काकांच्या सारख्या विद्वान् शास्त्र्यांचाच काय पण आमच्या घरीं काम करणाऱ्या धोंडू मोलकरणीचा सुद्धां संदेश घेतला असता मीं त्या वहींत !

अरेच्या ! बिचारी धोंडू ? तिला कुठें लिहायला येत होतें ? पण एवढ्यासाठीं मी तिचा संदेश घेतल्याशिवाय थोडाच राहणार होतों ! ‘ सकाळीं उठोनी देवासी भजावें ’ किंवा ‘ एका कोळियानें एकदां आपुलें ’ असें कांहींतरी वर लिहून खालीं तिचा आंगठा घ्यायला मीं कमी केलें नसतें ! धोंडूच्या संदेशानंतर मीं माझा त्यावेळचा अतिशय आवडता लेखक, इसाप याचा संदेश घेऊन शाळेंतल्या माझ्या साऱ्या दोस्तांना चकित करून टाकलें असतें !

छेः ! काय विचित्र कल्पना येतात माणसाच्या मनांत ! ज्याला मरून शेंकडों वर्षे होऊन गेलीं होतीं त्या इसमाचा संदेश घ्यायचा म्हणजे मला स्वर्गातच जायला हवें !

● ● ●

एकदम एक शांत गंभीर आवाज ऐकूं आला, ‘ मी आलों आहें ! ’

मी निरखून पाहिलें ? आधींच मला थोडें कमी दिसतें. त्यांत संधिप्रकाशाची भर. माझ्यापुढे ती उभी असलेली व्यक्ति अंधुक अंधुकच दिसत होती मला ! कांही केल्या मला तिची ओळख पटेना ! मीं विचारलें, ‘ आपलें नांव काय ? ’

‘ इसाप ! ’

इसाप ? साऱ्या जगांतल्या बाळगोपाळांचा आवडता लेखक इसाप ?

'छेः ! मला खरं वाटत नाहीं हें !'

'तूं स्वप्नांत नाहींस अशी तुझी खात्री करण्याकरतां तुला चिमटा काढूं का ?' इसापनें हंसत हंसत विचारलें. तो जवळ आला, पण त्यानें मला चिमटा काढला नाहीं. नुसत्या गुदगुल्या केल्या.

एकाद्या भिकाऱ्याला जादूचा दिवा मिळावा, त्यानें तो सहज घांसावा आणि समोर हात जोडून उभ्या राहिलेल्या राक्षसानें 'काय हवं ?' असा प्रश्न करतांच पंचपक्वान्नांच्या ताटाऐवजीं त्यानें चार पैशांचे चुरमुरे-फुटाणे मागावेत तशी स्थिति झाली माझी ! मीं इसापची आठवण केली—इसाप माझ्यापुढं येऊन उभा राहिला, पण—

गेल्या पंचवीस वर्षांत झालेल्या दोन महायुद्धांमुळें माझ्यासारख्या सामान्य मनुष्याच्या मनांत जो गोंधळ माजला आहे तो—बिचारा इसाप कसा दूर करणार ? चाणक्य, मॅकिव्हेली, शिवाजी किंवा नेपोलियन यांच्यापैकीं कुणीहि 'प्रवास करूं नका' या सध्यांच्या वर्तमानपत्रांतल्या जाहिरातीकडे दुर्लक्ष करून परलोकांतून मला भेटायला आला असता तर या प्रश्नाचा अधिक लवकर उलगडा होणें शक्य होतें !

मला वाटलें, आपलेंच चुकलें. धोंडू मोलकरणीनंतर शिवाजीचा किंवा नेपोलियनचा संदेश घ्यायचेंच आपण निश्चित करायला हवें होतें ! आपण इसापचें नांव उगीच घेतलें. तो बिचारा क्षणाचाही विलंब न लावतां धांवत आला ! पण आजकालचे हे बिकट प्रश्न या लहान मुलांच्या कथालेखकाला कसे सुटणार ? फार झालें तर वाघा-सिंहाच्या, कुत्र्या-मांजरांच्या किंवा माकडा-बोकडाच्या दोन नव्या गोष्टी रचून तो आपल्याला सांगेल. पण आजच्या परिस्थितीला उपयोगी पडणारा नवा संदेश हा पुराणपुरुष आपल्याला कुठून देणार ? तो संदेश स्टॅलिन, चर्चिल, रूझवेल्ट किंवा चँग कै शेक हेच देऊं शकतील !

पण माझ्यापुढें बिचारा गरीब इसाप उभा होता ! कांहीं तरी बोलायचें म्हणून मी त्याला म्हणालों, 'इसापकाका, तुझ्या गोष्टी पूर्वी मला फार मजेदार आणि बोधप्रद वाटल्या. पण आतां—आतांचें जग फार निराळें झालें आहे बाबा ! या देशांत कुठेंहि जा तूं ! अटलांटिक सनद, आठ ऑगस्ट, पिवळें संकट, काळा

बाजार, क्रिप्स योजना आणि बंगालमध्यें भुकेनें मरणारीं लाखों माणसें याशिवाय दुसऱ्या गोष्टीच तुला ऐकूं यायच्या नाहींत ? तुझ्या एकाहि गोष्टींत बॉम्बचा उल्लेख नाहीं. पण हल्लीं अन्नापेक्षां तेच अधिक स्वस्त झालेत ! '

इसापनें सोडलेला सुस्कारा मला ऐकूं आला. तो कांहींतरी बोलणार आहे असें मला वाटलें. त्याचे ओठ क्षणभर हालले ! पण त्याच्या तोंडांतून एक शब्दसुद्धां बाहेर पडला नाहीं. मी पुन्हां म्हणालों, ' इसापकाका, माणसाच्या काय किंवा जगाच्या काय लहानपणींचे प्रश्न लहानच असतात. इसापनीति वाचून ते सोडवितां येतात. पण जग आणि मनुष्य हीं मोठीं झालीं कीं, त्यांच्या आयुष्यांत जीं कोडीं उत्पन्न होतात तीं धर्माचे आणि तत्त्वज्ञानाचे ग्रंथ वाचूनसुद्धां उलगडतां येत नाहींत. काय सांगूं तुला काका ? चाळीस कोटींचा हा आमचा देश ! एखाद्या महासागराप्रमाणें त्याची गंभीर गर्जना आज जगाला ऐकूं यायला हवी होती. पण आज कोट्यवधि बेडयांचा आवाज तेवढा आमच्या देशांत घुमत आहे. दुपारीं अतिथीची वाट पाहून त्याला पंक्तीला घेतल्याशिवाय भोजन करावयाचें नाहीं अशी आमच्या संस्कृतीची उदार परंपरा ! पण आज भीक मागून आणलेल्या उष्ट्या अन्नांतले चार घांस उपाशी बायकोला द्यायला नवरा तयार नाहीं, अशीं दृश्यें या दुर्दैवी देशांत दररोज दिसूं लागलीं आहेत. एका रोगांतून दुसरा मोठा रोग उत्पन्न व्हावा त्याप्रमाणें एका महायुद्धांतून दुसरं महायुद्ध सुरू होत आहे. प्रत्येक वेळेला हें जगांतलं शेवटचं युद्ध आहे, हें लोकयुद्ध आहे असा—'

' लोकयुद्ध ? ' इसापनें मधेंच प्रश्न केला.

लोकयुद्ध म्हणजे काय हें त्या पुराणपुरुषाला मुळींच माहीत असणें शक्य नाहीं, असें मनांत येऊन मी लोकयुद्धाचे कांहीं अंक त्याला वाचायला देणार इतक्यांत इसाप म्हणाला, ' लोकयुद्ध हा मोठा विचित्र समास आहे ! तो मध्यमपदलोपी असून त्याचा विग्रह—'

मी हात जोडून म्हणालों, ' इसापकाका, व्याकरण आणि शुद्धलेखन यांच्यावर सध्यां बहिष्कार टाकलाय् आम्ही मराठी साहित्यिकांनीं. तुला काय सांगायचं असेल तें गोष्टीच्या रूपानंच सांग तूं मला ! '

' या लोकयुद्धवाल्यांना म्हणावं सिंह आणि दुसरे पशु ही माझी गोष्ट आधीं वाचा नि मग—'

मी ती गोष्ट आठवूं लागलों. त्या गोष्टींत एक म्हातारा सिंह होता. त्यानें तीन बऱ्या पशूंबरोबर—त्यांत त्याचा शत्रु असलेलें एक अस्वल होतें हेंसुद्धां मला आठवलें—एक करार केला. त्या करारांत मुख्य कलमें दोन होतीं. पहिलें सिंहासकट सर्व पशूंनीं एकविचारानें वागायचें आणि दुसरें जी कांहीं शिकार मिळेल ती सर्वांनीं सारखी वांटून घ्यायची. शिकारीच्या कामाला सुरवात झाली. म्हातारा सिंह मागेंमागेंच राहूं लागला. शेवटीं एके दिवशीं त्या सर्वांना एक हरिण मिळालें. तें मारलें त्या तिघानींच ! पण तें मरून पडतांच सिंहानें त्याचा कबजा घेतला. आणि ताबडतोब शिकारीचे चार सारखे वांटे केले. हें पाहून त्याचे तिन्ही दोस्त खूष होऊन मनांत म्हणूं लागले, 'मित्र असावा तर असा. किती न्यायी आहे हा सिंह. आपल्या स्वतःच्या वांट्याला थोडंसुद्धां अधिक मांस घेतलं नाहीं यानं !'

एक एक वांटा उचलून तो द्यायला सिंहानें सुरवात केली. तो आपला भाग आधीं देणार या कल्पनेनें त्या तिघांही दोस्तांच्या तोंडाला पाणी सुटलें. पण सिंहानें पहिला वांटा आपल्यापुढें ओढला आणि तो म्हणाला, 'मित्रहो, मी या अरण्याचा राजा आहे हें तुम्हांला ठाऊकच आहे. घरावांचून गृहस्थ नाहीं आणि करावांचून राजा नाहीं. तेव्हां तुम्ही मला द्यायचा कर म्हणून मी हा पहिला वांटा मोठ्या आनंदानें घेतो !'

लगेच दुसऱ्या वांट्यावर झडप घालून तो म्हणाला, 'माझ्या पराक्रमाचा मोबदला म्हणून या वांट्यावर माझा हक्कच आहे ! हें हरिण तुम्ही मारलं असलंत् तरी मला पाहून तें भ्यालं नसतं तर तें तुमच्या हाताला लागलंच नसतं ! सेनापति कधीं प्रत्यक्ष लढाई करीत नाहीं. पण नेहमीं जय होतो तो त्याचाच ! तसंच आहे हें !'

दोन वांटे सिंहानेंच गडप केलेले पाहून त्याचे तिघे दोस्त कावरेबावरे झाले. उरलेले दोन वांटे तिघांत वांटायचे म्हणजे कुणातरी एकावर उपाशीं राहायची पाळी येणार हे उघड होतें. तो एक आपण होऊं नये अशी प्रत्येक जण मनांतल्या मनांत देवाची प्रार्थना करीत होता. इतक्यांत सिंह म्हणाला 'मी तुमचा राजा, तुम्ही माझी प्रजा. तुमच्या कल्याणासाठींच माझा अवतार आहे. सर्व धर्मांत राजनिष्ठा हाच श्रेष्ठ धर्म आहे हें तुमच्यासारख्या विद्वानांना कांहीं वर्णन करून सांगायला नको ! त्या निष्ठेला जागून हा तिसरा वांटा भक्तिपूर्वक तुम्ही मला द्याल

अशी माझी खात्री आहे. आजपर्यंत अनेक राजनिष्ठ लोकांनीं आपल्या प्रभूकरतां पोटच्या गोळ्यांचे बळीसुद्धां दिलेले आहेत. त्या मानानें पोटचा घास देणं हें—'

तिसरा वांटा पंजानें उचलून आपल्यापुढें घेत सिंह पुढें म्हणाला 'तुमच्या या राजनिष्ठेचा येत्या पदवीदानसमारंभाच्या वेळीं अवश्य विचार केला जाईल.'

शिकारींतला अवघा एकच वांटा उरलेला पाहून सिंहाचे ते तिन्ही दोस्त गडबडून गेले. काय करावें तें त्यांना सुचेना. इतक्यांत सिंह म्हणाला 'आतां हा शेवटचा भाग ! मित्रहो तुम्हांला ठाऊकच आहे कीं सध्याचा काळ फार आणीबाणीचा आहे. आपल्या या अरण्यावर कोण केव्हां स्वारी करील याचा नेम नाहीं. आपल्या सैन्याकरतां आपल्यापाशीं बिलकूल अन्नसामग्री नाहीं. पुढें येणारी अडचण आधीं ओळखून तिची सोय जो अगोदर करून ठेवतो, तोच खरा राजा ! म्हणून मी हा वांटा सैन्याच्या उपयोगाकरतां राखून ठेवीत आहे !'

● ● ●

गोष्ट आठवतां आठवतां मी तिच्यांत इतका रंगून गेलों कीं इसाप आपल्याजवळ उभा आहे याची शुद्धच राहिली नाहीं मला !

सिंहानें चवथा वांटा उचलल्यावरही गोष्टीतलें अस्वल गप्प बसलें कीं काय हें मला आठवेना. तें इसापला विचारावें म्हणून मी आजूबाजूला पाहिलें. पण स्वारी केव्हांच बेपत्ता झाली होती ! माझ्याप्रमाणेंच लहानपणचा एक दिवस देवापाशीं परत मागणाऱ्या दुसऱ्या कुणीतरी प्रौढ मनुष्यानें त्याची आठवण केली असावी ! आणि इसाप माझ्या खुर्चीजवळ असता तरी माझ्या प्रश्नाचें उत्तर देणें त्याला अशक्यच होतें म्हणा ! कारण—

मी लगेच आरामखुर्चीतून उठून इसापनीति उघडून पाहिली. तिच्यांत सिंहानें तीन पशूंना व्यवस्थित बनवून सबंध हरिण गिळंकृत केल्याची ही गोष्ट आहे. पण या गोष्टींतले ते तीन पशू कोण हें सांगायचें मात्र इसाप अजिबाद विसरला आहे ! त्या तिघांत एक अस्वल होतें असें मला वाटलें ! कां बरें वाटावें तसें ?'

अरे हो ! बरोबर आहे ! संध्याकाळीं फिरून परत येतांना कोंपऱ्यावर एक दरवेशी एका अस्वलाचे खेळ करीत होता. आपण क्षणभर तिथें थांबलों सुद्धां होतों. एक पैसा सुद्धां टाकला होता कीं त्या अस्वलापुढें आपण ! त्यामुळेंच या गोष्टींत एक अस्वल आहे असा भास झाला आपल्याला !

# गंबुशियाचा विजय होवो !  १३

एखादी सभा संपल्यावर स्वाक्षरीकरितां मुलें—मुली भोंवतालीं जमल्या म्हणजे मी अगदीं भांबावून जातों. नुसत्या सह्या ठोकायचेंच काम असलें तर तें कंटाळत कां होईना, कसेंबसें संपवितां येतें. पण प्रत्येक विद्यार्थी आणि विद्यार्थिनी संदेशाचा हट्ट धरून बसली म्हणजे आपल्या बुद्धीचें दिवाळें वाजल्याचें जाहीर करून एका क्षणांत या कटकटींतून मोकळें व्हावें असें वाटूं लागतें. संदेश हा माणसाच्या चेहऱ्यासारखा असतो. अनेकदां एका क्षणांत मनुष्याच्या अंतरंगाची त्याच्यावरून पारख होऊं शकते ! आतां आपण फार सज्जन आणि बुद्धिवान आहों हें सिद्ध करणारा संदेश—आणि तोहि प्रत्येक व्यक्तीला नवा नवा असा—माणसानें द्यायचा कुठून ? अशावेळीं पुस्तु भाषा आपल्याला येत असती तर आपण या संकटांतून सहीसलामत बचावलों असतों असा विचार सुद्धां मनांत आल्यावांचून राहत नाहीं.

या आपत्तींतून पार पडायला पुस्तुशिवाय आणखी एक पळवाट आहे. ती म्हणजे वाचणारा प्रत्येक मनुष्य चकित होऊन जाईल असा एखादा विलक्षण संदेश सर्वांच्या वह्यांत भराभर लिहीत सुटणें. परवां मी पांचपन्नास मुलांवर हाच प्रयोग केला. प्रत्येकाच्या वहींत मी लिहीत होतों. ' गंबुशियाचा विजय होवो ! ' बिचारीं मुलें आपल्या वह्या उचलून हा संदेश वाचीत आणि कांहीं शंका विचारावी तर आपलें भूगोलाचें अज्ञान प्रकट होईल अशा भीतीनें मुकाट्यानें निघून जात !

' गंबुशियाचा विजय होवो ' हा माझा त्या दिवशींचा संदेश वाचून गंबुशिया हा रशियाचा कुणीतरी धाकटा भाऊ असावा, चालू महायुद्धांत या छोट्या देशानें लोकशाहीच्या बाजूनें उडी टाकली असावी, आणि फक्त मुत्सद्यांच्या भाषणांत व भोळ्या भाबड्या लोकांच्या स्वप्नांत जें नवें जग वारंवार दिसूं लागलें आहे, तें

रंगविण्याला लागणारा रंग आपल्या रक्तांतून या राष्ट्रानें भरपूर दिला असावा असेंच कुणालाहि वाटेल ! असा कांहीं तरी घोंटाळा होऊं नये म्हणून आरंभींच हें सांगणें बरें कीं, गंबुशिया हा पृथ्वीच्या पाठीवरला देश नाहीं, ती एक माशांची जात आहे ! ज्यांचा जगानें अवश्य जयजयकार केला पाहिजे असे मासे आहेत ते !

समुद्रकांठीं आयुष्यांतलीं अठरा वर्षे काढूनहि मला या माशाचें नांव सुद्धां परवांपर्यंत ठाऊक नव्हतें. जगांत ज्ञानापेक्षां अज्ञान आणि सद्बुद्धीपेक्षां दुर्बुद्धीच अधिक असते असें कुणीतरी म्हटलें आहे. अशावेळीं तें अगदीं खरें वाटूं लागतें. फुलपांखरांपासून रानडुकरांपर्यंतच्या निरनिराळ्या आकारांचे आणि स्वरूपांचे मासे पाहिलेल्या माझ्यासारख्या मनुष्यानें ‘ गंबुशिया ’ हें नांवसुद्धां ऐकलेलें असूं नये हें किती विचित्र दिसतें ! पण जगांत बहुधा विचित्र गोष्टीच सत्य असतात !

परवांसुद्धां गंबुशियाचा आणि माझा पहिला परिचय झाला तो अगदीं योगायोगानें ! गोऱ्या लोकांप्रमाणें मलेरियाचाहि जगांतल्या सर्व देशांत प्रसार झाला असला तरी आपल्या या भरतभूमीवर अलीकडे त्याची अधिक कृपा झाली आहे. राजे आणि ग्रह यांच्याप्रमाणें रोग्यांच्याही कृपादृष्टींत स्थानपरत्वें फरक पडतो. मलेरिया महाराजांची मेहेरनजर असलेले हिंदुस्थानांतले प्रांत म्हणजे बंगाल व कोंकण ! कोंकणातलें सावंतवाडी संस्थान हें पूर्वी रंगींत लांकडी खेळण्याबद्दल जेवढें प्रसिद्ध होतें, तेवढेंच आज तें मलेरियाबद्दल प्रख्यात आहे. पितृभूमीचा हा प्रसाद मीं भरपूर चाखला असल्यामुळें वर्तमानपत्रें वाचतांना कुठेंही मलेरियावर एखादें नवें औषध दिसलें कीं पूर्वकाळच्या पाणिनीला सूत्रांत एक मात्रा कमी झाल्यामुळें जो आनंद झाला असेल, किंवा आजकालच्या दिग्दर्शकाला चित्रपटांत एक नाच अधिक घुसडायला मिळाल्यामुळें जें समाधान वाटत असेल, त्याचा अनुभव मीही घेऊं शकतों. यामुळेंच परवां ‘ मलेरियाविरुद्ध माशांचा उपयोग, ’ हे शब्द वर्तमानपत्रांत वाचतांच जनरल आयसेनहोर वगैरे मंडळींनी युद्धाच्या धुमश्चक्रींत सोडून देऊन मी हा महत्त्वाचा मजकूर मोठ्या उत्कंठेनें वाचूं लागलों.

मलेरियाविरुद्ध माशाचा उपयोग या मथळ्यावरच मी प्रथमदर्शनीं अगदीं बेहद्द खूष झालों. माझ्या मनांत आलें—माशा नेहमींच आपल्याला त्रास देतात. मलेरियाविरुद्ध त्यांचा उपयोग होत असेल तर फार मजा होईल. जर्मनी आणि रशिया यांच्या टक्करींत इंग्लंडचा जसा फायदा झाला, त्याप्रमाणें मलेरियाचे जंतु आणि

महामारीसारखे रोग निर्माण करणाऱ्या माशा यांची परस्पर लढाई सुरू होईल, तर हिंदुस्थानांतल्या हजारों खेड्यापाड्यांतल्या दरिद्री नि अडाणी माणसाचें आयुष्य कितीतरी सुखावह होईल. एरवीं हरतऱ्हांचे रोग पसरविणाऱ्या माश्या मलेरियाच्या शत्रुपक्षांत कां सामील व्हाव्यात याविषयीं मांझ्या मनांत शंका आली नाहीं असें नाहीं. पण साम्राज्यशाहीचे कट्टे कैवारी जसे नाझीशाहीविरुद्ध हत्यार उपसतात, किंवा बडेबडे लेखक आज एखाद्या चित्रपट निर्मात्याची पैजारांनीं पूजा करून उद्या त्यांच्यावर पुष्पवृष्टि करायला जसे तयार होतात, तसेंच हें निसर्गातलें कांहीं राजकारण असावें अशी मीं माझ्या मनाची समजूत करून घेतली. पण मथळ्याखालचा मजकूर वाचतांच या माझ्या शंकेचें क्षणार्धात निरसन झाले. ‘गंबुशिया’ हे पाण्यांतले मासे आहेत हा प्रकाश माझ्या डोक्यांत पडला. आपल्या वैमानिक हल्ल्यांनीं माणसांना छळणाऱ्या माश्याशीं त्यांचें दूरचेंसुद्धां कांहीं नातें लागण्याजोगें नव्हतें.

हे ‘गंबुशिया’ मूळचे दिल्लीचे! तिथून त्यांना मुंबईला आणण्यांत आलें. नव्वद ओव्हरसीयर्स व दोनशें कामगार नेमून मुंबईच्या म्युनिसिपालिटीनें मलेरियाच्या जंतूंचा निःपात करण्याचें काम ‘गंबुशिया’च्या मदतीनें सुरू केलें. हे मासे मलेरियाचे व बिनमलेरियाचे असे दोन्ही प्रकारचे जंतु खातात. मध्यम आकाराचा एक मासा रोज सुमारें एकशेंपासष्ट जंतु खातो म्हणे. अर्थात् स्वभावतः धडधाकट प्रकृतीचे असलेले, नियमित व्यायाम घेणारे किंवा विनोदी स्वभावामुळें लठ्ठ झालेले असे जे गंबुशिया असतील ते दररोज मलेरियाच्या तीनतीनशें जंतूंचासुद्धां फन्ना उडवीत असतील याबद्दल शंका बाळगण्याचें मला मुळींच कारण नव्हतें. ‘गंबुशिया’चें हें कर्तृत्व लक्षांत घेऊन या माशांची पैदास वाढविण्याचें मुंबईच्या म्युनिसिपालिटीनें ठरविलें आहे हें वाचून मला आनंद झाला. लहान लहान ‘गंबुशिया’ सुरक्षित राहावेत म्हणून म्युनिसिपालिटीनें एक दगडी हौद बांधून त्यांत त्यांना ठेवणार आहे हें कळतांच हा दगडी हौद पहायला जाण्याचा बेतसुद्धां मीं मनांत निश्चित करून टाकला.

मुंबईत वाढविल्या जाणाऱ्या या गंबुशियांचा हिंदुस्थानांतल्या हजारों खेड्यांपाड्यांना हैराण करणाऱ्या मलेरियाविरुद्ध मोहीम करण्याच्या बाबतींत कसा व किती उपयोग होणार हा बिकट प्रश्न माझ्या डोळ्यापुढें उभा राहिला नाहीं असें नाहीं.

पण त्या प्रश्नापेक्षांहि या बातमींतून मिळालेली महत्त्वाची अशी एक गोष्ट मला पुन्हां पुन्हां आनंदित करीत होती ती म्हणजे मलेरियाच्या जंतूंचा नाश करणारा प्राणी निसर्गानें स्वतःच निर्माण करून ठेवला आहे हें नवें ज्ञान !

तें ज्ञान पुन्हां पुन्हां माझ्या कानांत गुणगुणत होतें, गंबुशियांची पैदास करणें कठिण असेल; खेड्यापाड्यांतून या माशांचा व्यवस्थित प्रसार होऊन मलेरियाचें संपूर्ण निर्मूलन व्हायला खूप कालावधि लागेल. पण त्यांच्या अस्तित्वामुळें जगांतल्या सर्व सज्जनांना, निरनिराळ्या क्षेत्रांत अन्यायाविरुद्ध झगडत राहणारांना आणि सत्तेशीं किंवा संपत्तीशीं टक्कर देतां देतां डोकें रक्तबंबाळ झाल्यामुळें धीर सुटलेल्या सर्व वीरांना नवीन स्फूर्ति मिळायला काय हरकत आहे? आजच्या जगांत मलेरियाच्या जंतूंप्रमाणें दुर्जनांचा, देशद्रोह्यांचा आणि मानवतेच्या हाडामांसानें आपले महाल बांधून त्यांच्यांत तिच्या रक्ताची मदिरा पीत पीत शांतिपाठ घोकणारांचा सुळसुळाट झाला आहे हें खरें. पण मलेरियाच्या जंतूंना खाणारे मासे जसे निसर्गानें उत्पन्न केले आहेत, त्याप्रमाणें जगांतल्या पाशवी शक्तींशीं झगडणाऱ्या शूर सज्जनांनाहि निर्माण करायला तो विसरला नाहीं. हीं सत्प्रवृत्तीचीं माणसें आज निरनिराळ्या देशांत विखुरलेलीं असतील, एकट्यानें केलेल्या झगड्यांत अपेश आल्यामुळें त्यांच्या मनावर मधूनमधून निराशेचीं छाया पसरत असेल, त्यांच्यापैकीं अगणित लहान लहान व्यक्तींना सुरक्षितपणें मोठें होऊन जग सुधारण्याचें आपलें काम करण्याइतकी संधि सहसा मिळत नसेल. मुंबईच्या म्युनिसिपालिटीनें गंबुशिया जातीचे लहान लहान मासे वाढविण्यासाठीं जसा एक दगडी हौद बांधायचें ठरविलें आहे, त्याप्रमाणें त्यांनाहि आपली एका वज्रासारखी अभेद्य संघटना बनवावी लागेल! पण हीं सर्व वैगुण्यें दूर होतील तेव्हां त्यांचाच या जगांत विजय होईल यांत शंका नाहीं. तात्पुरत्या पराभवाच्या काळांत आणि निराश मनःस्थितींत एक वाक्य या शूर सज्जनांनीं नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे—‘ एक गंबुशिया दररोज एकशेंपांसष्ट मलेरियाचे जंतु खातो. ’

# काळे आणि गोरे

# १४

कित्येकांना संध्याकाळीं उशीरा चहा घेतला कीं रात्रभर झोंप येत नाहीं. मला असला कांहीं त्रास सहसा होत नाहीं. कदाचित् चहा हा माझा पूर्वजन्मींचा मित्रही असूं शकेल! मात्र केव्हां केव्हां मलाही झोंप येत नाहीं हें खरें! माझ्या या निद्रानाशाचीं कारणें फक्त दोनच असतात—ढेकणांनी सुरू केलेली गनिमीकाव्याची लढाई किंवा मनासारखें न जमणारें एखादें कथानक!

हीं दोन्हीं कारणें नसतांना परवां मध्यरात्रीं माझ्या डोळ्यांवरली झोंप एकाएकीं उडून गेली तेव्हां मी आश्चर्यचकित झालों. चांदण्या रात्रीं फटफटीत उजाडलें अशा समजुतीनें अवेळींच कावळे कावकाव करूं लागतात, तशी आपली फसगत झाली असावी असा मीं तर्क केला! लगेच माझ्या मनांत आलें—समोरच्या चाळींतल्या कुणातरी विद्यार्थ्याच्या घड्याळाचा हा पुण्यप्रभाव असावा! डोळे अगदीं पेंगळूं लागल्यावर त्या महात्म्यानें गजर लावला असावा! त्यामुळें किल्ली दिल्यावर गजराचा बारावरला कांटा पांचावर नेऊन ठेवण्याची शुद्ध कांहीं त्याला राहिली नसेल! साऱ्या आळीनें नुकसानभरपाईची फिर्याद करायला हवी त्याच्यावर!

पुन्हां पांच मिनिटांत आपल्याला झोंप लागेल अशा कल्पनेनें मी डोळे मिटून पडलों. पण झोंप ही स्वातंत्र्यासारखी आहे. ती गमावणें फार सोपें पण परत मिळविणें तितकेंच कठिण!

मी अस्वस्थपणानें तळमळूं लागलों. पंचवीसदां या कुशीवरून त्या कुशीवर झालों; शेवटीं कुणाच्या तरी जोरजोराच्या बोलण्यानें आपल्या झोंपेला अडथळा येत आहे अशी माझी खात्री झाली. मी कान देऊन ऐकूं लागलों. आमच्या पलीकडेच राहणाऱ्या तरुण जोडप्याचा प्रेमकलह रात्रीच्या शांत वेळीं आपणाला अधिक स्पष्टपणानें ऐकूं येत असावा अशी मला शंका आली. दुसऱ्याचें पत्र चोरून वाचूं

नये, आणि कुणाचेंही बोलणें चोरून ऐकूं नये वगैरे नीतिनियम मीं लहानपणीं अगदीं तोंडपाठ केले होते पण—

केवळ पाठांतरानें जगात सदाचार निर्माण होत असता तर पृथ्वीवर स्वर्ग केव्हांच अवतरला असता !

मी कानांत प्राण गोळा करून ऐकूं लागलों. छेः ! तें नवराबायकोचें गोड गोड भांडण नव्हतें. अशा भांडणांत फार फार तर ठिणग्या उडतात. पण मला जो गोंधळ ऐकूं येत होता त्यावरून कुठें तरी भयंकर आग लागल्याचा भास होत होता !

• • •

मीं पुन्हां डोळे मिटून घेतले. पण आतां तो गोंधळ आणि गलबला शतपटींनीं वाढला होता. माझ्या डोक्यांत घणाचे घाव बसूं लागले. भर मध्यरात्रीं आपल्या अगदीं जवळपास एवढा मोठा कसला दंगा चालला आहे हें मला कळेना. इत-क्यांत कुणाचे तरी शब्द मला ऐकूं आले—'मित्रहो, असे भांडूं नका. आपण सध्यां लोकशाहीच्या युगांत आहोंत. या युगात एखाद्याचा गळा कापायचा असला तरी तो सुद्धां कायद्याच्या कलमानं किंवा सभेच्या नियमानंच कापावा लागतो. तरवारढालींचा काळ आतां मागें पडला आहे. शब्द आणि कायदा यांचा हा काळ आहे. हें लक्षांत घेऊन मघांपासून आकांडतांडव करीत सुटलेल्या सर्व काळ्या-गोऱ्या बंधूंना मी अशी नम्र विनंति करतों कीं, यापुढं आपलं काम आपण पार्लमेंटरी पद्धतीनं चालवूं या. कुंकवावांचून जशी सवाष्ण नाहीं, लुटीवांचून जसं साम्राज्य नाहीं, थापांवाचून जसं राजकारण नाहीं, तशी सभापतीवांचून सभा नाहीं, या सभेचा अध्यक्ष होण्याला या असंख्य केंसांत फक्त मीच लायक आहे, हें मुद्दाम सिद्ध करण्याची आवश्यकताच नाहीं ! अध्यक्ष होण्याला विद्वत्तेपेक्षां श्रीमंतीचीच अधिक जरूर लागते. आतां या मनुष्याच्या डोक्यावरल्या हजारों केंसांत माझ्याइतका लांबलचक आणि जाडजूड असा दुसरा एक तरी केंस आहे का ? तसा केंस दाखवा. मी लगेच अध्यक्षपदावरला माझा हक्क सोडून देईन ! अध्यक्ष व्हायला यापेक्षांहि जो मोठा गुण लागतो त्यांत तर तुमच्यापैकीं एकहि केंस माझा हात धरूं शकणार नाहीं. अध्यक्ष हें लोकशाहीच्या व्याकरणांतलं उभयान्वयी अव्यय आहे असं कुणींतरी म्हटलं आहे ! अगदीं बरोबर आहे तें !

‘ मी तुमचा आहे ’ असें एका तोंडानं लोकांना सांगत असतांना दुसऱ्या तोंडानं जो सरकारपक्षाशीं चुंबाचुंबी करतो तोच सभ्य गृहस्थ या जगांत दीर्घकाल अध्यक्ष होऊं शकतो. मीहि असाच सर्वश्रेष्ठ सभ्य गृहस्थ आहे. म्हणाल तर मी काळा आहे, म्हणाल तर मी गोरा आहे. तेव्हां—

टाळ्यांचा मोठा कडकडाट झाला. तो थांबतांच मघांचा तो करडा केंस पुन्हां बोलूं लागला, ‘ आतां माझी सर्व काळ्या आणि पांढऱ्या केशबांधवांना एक अत्यंत नम्र विनंति आहे. प्रत्येक पक्षाच्या सर्व माणसांनीं आज बोलायचें ठरविलें तर आपल्यापुढें असलेल्या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल कधींच लागणार नाहीं. तेव्हां काळ्या केंसांनीं आपला एक पुढारी निवडावा. पांढऱ्या केंसांनींहि तसेंच करावें. या दोन लोकप्रिय पुढाऱ्यांनीं आपआपल्या पक्षाची बाजू पुढें मांडावी, म्हणजे सत्य कोणत्या बाजूला आहे हें आपोआप दिसून येईल. मित्रहो, आज जगांत लोकशाहीवर पूर्वीप्रमाणें लोकांचा विश्वास राहिलेला नाहीं. सत्ताधाऱ्यांचा आणि संपत्तिवाल्यांचा स्वार्थ नागडा उघडा दिसूं नये म्हणून त्यांच्या अंगावर घातलेलें एक पोकळ शब्दांचें सुंदर पांघरूण अशी लोकशाहीविषयीं अनेकांची समजूत होत चालली आहे. ती आपल्या या सभेनं नाहींशी होईल अशी आशा करून आणि पहिल्यांदा काळ्या केंसांच्या पुढाऱ्याचें भाषण होईल असें सुचवून मी खालीं बसतों. ’

क्षणभर गंभीर शांतता पसरली.

लगेच टाळ्यांचा कडकडाट झाला. पण तो मघाइतका मोठा नव्हता. फक्त काळ्या केंसांनींच आपला पुढारी बोलायला उठल्याबरोबर टाळ्या वाजविल्या असाव्यात असा मीं तर्क केला.

खणखणीत आवाजांत त्या पुढाऱ्यानें आपलें भाषण सुरू केलें, ‘ अध्यक्षमहाराज आणि बंधुभगिनींनो, ज्या माणसाच्या डोक्यावर आपण नांदत आहोंत त्याची ही झोंपेची वेळ आहे. लांबलचक भाषणें सुरू झालीं, तर त्या बिचाऱ्याची झोंपमोड होईल तेव्हां मीं माझें म्हणणें अगदीं थोडक्यांत सभेपुढें मांडतों. थोड्या वर्षांपूर्वीं या मस्तकाच्या पृष्ठभागावरल्या प्रदेशांत आम्ही काळे केंस एकजुटीनें आणि मोठ्या आनंदानें राहत होतों. या डोक्याच्या मालकाचें आमच्यावर केवढें प्रेम होतें तेव्हां ! दिवसांतून शंभर वेळां तो आम्हांला कुरवाळायचा, आमच्या

अंगांना वारंवार सुवासिक तेलें फांसायचा, आरशापुढें उभा राहून आमची सुंदर छबी तो आम्हांला दाखवायचा! आमचेंच राज्य होतें त्यावेळीं त्याच्या डोक्यावर!

पण एके दिवशीं एक गोरेला केंस आमच्या राज्यांत आला. हा पांढऱ्या पायाचा प्राणी आपल्यामध्यें नको असें अनेक काळे केंस म्हणूं लागले. आमच्या मालकालाहि हा पांढऱ्या पायाचा पाहुणा पाहून कांहीं बरें वाटलें नाहीं! एक कात्री घेऊन त्यानें त्याला छाटून टाकण्याचा प्रयत्न केला. पण हा पांढरा असला तरी केंस आहे, आपलाच एक बांधव आहे, अशा उदात्त भावनेनें कांहीं काळ्या केंसांनीं स्वतःच्या शरीराच्या ढाली पुढें करून त्याचें त्या कात्रीपासून संरक्षण केलें. पण या कृतघ्नताला या उपकाराची काडीभरसुद्धां किंमत वाटली नाहीं. आम्ही आमच्या मालकीच्या प्रदेशांत पाहुणा म्हणून याला प्रथम राहूं दिलें. पण या गोऱ्या पाहुण्यानें लवकरच आपला गातावळा गोळा करायला सुरवात केली. हळुहळू पांढऱ्या केंसांची या मस्तक प्रदेशांत भयंकर गर्दी होऊं लागली. आपल्याला ऐसपैस राहायला जागा मिळावी म्हणून किती काळ्या केंसांचे या गोऱ्यांनीं खून केले असतील याची गणतीसुद्धां करतां येणार नाहीं. पाहुणा हा देवासारखा असतो असें आम्हीं काळे मानीत आलों असल्यामुळें कांहीं दिवस पांढऱ्या केसांचा हा जुलूम आम्हीं मुकाट्यानें सहन केला. पण एके दिवशीं एक चित्रपट पाहून आमच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. ‘गोऱ्या मनुष्याची छाया’ असें कांहीं तरी नांव होतें त्या चित्रपटाचें. गोऱ्या माणसाची काळीकुट्ट छाया साऱ्या जगावर कशी पसरत चालली आहे, जिथं जिथं ही पांढऱ्या पायाची बया जाते तिथल्या तिथल्या लोकांच्या आयुष्यांत काळा कभिन्न काळोख कसा पसरतो आणि शेवटीं त्यांच्या हातांतल्या फुलांच्या बेड्या होऊन त्या त्यांच्यांच पायांत कशा पडतात हें सारें त्या चित्रपटांत दाखविलें होतें. तो पाहतांच आमचे डोळे उघडले. आज ना उद्यां आमचीही अशीच गत होणार अशी आमची खात्री होऊन चुकली. ‘या माणसाचं मस्तक मूळचं आमचं आहे, या डोक्याचे खरेखुरे मालक आम्ही आहोंत, तुम्हाला इथं राहण्याचा बिलकूल अधिकार नाहीं,’ असें आम्ही सारे काळे केंस या पांढऱ्यांना बजावून सांगूं लागलों. पण चलेजाव या आमच्या घोषणेचा यांच्यावर केसभरसुद्धां परिणाम झाला नाहीं. उलट आमच्यांतलेच कांहीं लोक या पांढऱ्या केंसांना फितूर झाल्यामुळें आम्हांलाच आजकाल यांच्यापुढें मान वांकवावी लागत आहे! ‘परवशता पाश दैवें ज्याच्या गळां लागला, मातृभूमि ज्याची त्याला होत बंदिशाला’

असें एक लोकप्रिय गाणें लहानपणीं आम्हीं ऐकलें होतें. तें आतां घडीघडीला आम्हांला आठवतें. त्या ओळींनीं मन अगदीं अस्वस्थ होऊन जातें. बंडखोर विचार त्याच्यांत थैमान घालूं लागतात—जन्मभूमि हाच ज्याचा तुरुंग होतो त्यानें जगावें तरी कशाला ? तो तुरुंग फोडतां फोडतां ज्यांना मरण येईल, तेच भाग्य-वान, तेच खरे जगले असेंच जग म्हणेल. एक ना दोन असले हजार विचार आमच्या मनांत येतात. आमच्या मनांतल्या या ज्वालामुखीचा स्फोट होण्याच्या आधीं या पांढऱ्या केंसांनीं मुकाट्यानें आमच्या देशांतून काढता पाय घ्यावा असें आतां आमचें निर्वाणीचें मागणें आहे. जुलमाची आणि आक्रमणाची दृष्टि त्यांनीं सोडली तर आम्ही नेहमींच मित्रभावानें त्यांच्याशीं वागूं एवढें सांगून दुर्दैवी काळ्या केंसांची ही छोटी कैफियत मी पुरी करतों !

लगेच पांढऱ्या केंसांचा प्रमुख उभा राहिला असावा. कारण टाळ्यांचा आवाज सुरू होतो न होतो तोंच तो थांबला. तो पांढरा केंस शांत स्वरानें म्हणाला, ‘ मित्रहो, ही टाळ्या वाजविण्याची वेळ नाहीं. जगाची यापुढें सुधारणा होणार कीं तें पुन्हां रानटी स्थितींत जाणार हें आजच्या आपल्या या सभेच्या निर्णयावर अवलंबून आहे. माझ्या सन्मान्य काळ्या बंधूंनीं आम्हां सज्जन गोऱ्या लोकांवर नाही नाहीं ते आरोप केले आहेत. पण पांढरे केंस हे काळ्या केंसांप्रमाणें कुठल्याही आंधळ्या भावनेचे भक्त नसतात. आम्ही फक्त सत्याची आणि शास्त्रीय दृष्टीची पूजा करतों. म्हणून काळ्या केंसांची एक अक्षरानेंहि निंदा न करतां मी आमची बाजू थोडक्यांत सभेपुढें मांडतों.

या झोंपलेल्या माणसाच्या मस्तकाची मालकी आपल्याकडे आहे असें काळे केंस म्हणतात ! आम्ही त्यांच्या मागाहून इथें आलों ही गोष्ट मला नाकबूल नाहीं. पण दुधाचे दांत पहिल्यांदा येतात आणि आयुष्यभर खायला उपयोगी पडणारे दांत मागाहून येतात म्हणून काय दुसऱ्या दांतांची किंमत कुणीं कमी मानली आहे ? जगण्याच्या दृष्टीनें तेच खरे मनुष्याचे दांत ! आम्ही पांढरे केंसहि तसेच आहों. आम्हीं या मस्तकावर उशिरा प्रवेश केला हें खरें ! पण आमच्यामुळेंच हें मस्तक धारण करणाऱ्या मनुष्याला विद्वान् ही पदवी प्राप्त झाली आहे. याच्या डोक्यावर नुसते काळे केंस होते तेव्हां याच्या विद्वत्तेला कुणी कुत्रा देखील विचारीत नव्हता ! पोरकट म्हणत होते सारे त्याला !

असें असूनसुद्धां आम्हां गोऱ्यांनाच हे काळे कृतघ्न म्हणत आहेत. चोराच्या उलट्या म्हणतात त्या ह्या! आम्हीं एकदम स्वारी करून हा मस्तकप्रदेश पादाक्रांत केला नसला, तरी आतां त्याच्यावर आमचाच हक्क आहे असें मी विनदिक्कतपणें म्हणतों. आमच्यापैकी जो पहिल्यांदा आला त्याला पाहुणा म्हणून या काळ्यांत मिसळून राहणें प्राप्तच होतें. हें राजकारण आहे. तें या निर्बुद्ध काळ्या केंसांना कधीं कळायचें नाही. आम्ही संख्येनें थोडे होतों तेव्हां कलप लावून घेऊन या काळ्यांत मिसळून जात होतो! अशा या कृत्याला आम्ही गोरे लोक मुत्सद्दीपणा म्हणतों. काळ्यांनीं हा अप्रामाणिकपणा आहे म्हणून कितीहि बोटें मोडलीं तरी जगांत आजपर्यंत मुत्सद्दीपणाचाच विजय होत आला आहे आणि यापुढेंहि तो तसाच होत रहाणार आहे!

या मनुष्याच्या मस्तकावरलें आमचें आक्रमण हे साम्राज्यशाहींच्या बकासुरी भुकेचें लक्षण आहे असें काळे केंस नेहमी म्हणतात! पण आम्ही हें आक्रमण परोपकाराकरतां करीत आहोंत हे त्यांच्या लक्षातच येत नाहीं. या मनुष्याच्या डोक्यावर जोंपर्यंत नुसते काळे केंस होते, तोंपर्यंत नानाप्रकारचे शृंगारिक विचार त्याच्या डोक्यांत येत असत. रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या बायकांकडे टक लावून पाहण्याचा मोह अनावर होत असे. पण आम्ही त्याच्या डोक्याचा निम्माशिम्मा कबजा घेतल्याबरोबर याच्या मनांत धर्माचे आणि तत्त्वज्ञानाचे विचार येऊं लागले. ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम वगैरेंचे ग्रंथ वाचण्याची हल्लीं याला जी इच्छा उत्पन्न झाली आहे तिचें श्रेय आम्हां गोऱ्यांनाच दिलें पाहिजे. ज्या दिवशीं याच्या डोक्यावर आमचें पूर्ण राज्य स्थापन होईल त्या दिवशीं हा शंभर टक्के सद्गृहस्थ होईल आणि सुंदर तरुणीलासुद्धां आई म्हणून भर रस्त्यांत साष्टांग नमस्कार घालील अशी आमची खात्री आहे.

या काळ्या केंसांना या मस्तकावर पुन्हां आपले राज्य स्थापन करावेंसें वाटतें. पण आजच्या जगांत आपली योग्यता काय आहे हें मात्र यांना बिलकुल कळत नाहीं. 'काळा बाजार' आणि 'काळा कायदा' हे सध्यांचे दोन शब्दप्रयोगच काळ्यांची नालायकी सिद्ध करण्याला समर्थ आहेत. उलट आम्हा गोऱ्यांची लोकप्रियता पहा. काळ्या नवऱ्यालासुद्धां गोरी बायकोच नेहमीं पसंत पडते! नुसतें चलेजाव म्हटल्यानें या जगांत आपण मुत्सद्दीपणानें जिंकलेल्या देशांतून कुणी

निघून जात नाहीं हें कळण्याइतकी अक्कलसुद्धां या काळ्यांना नाहीं. म्हणून मी म्हणतों—'

● ● ●

वादळी वातावरणांतले चित्रविचित्र स्वर मधेंच उमटून रेडिओवरलें भाषण ऐकूं येईनासें व्हावें तसें झालें एकदम. मी डोळे उघडून पाहूं लागलों. माझें मलाच हंसूं आलें. मी डोक्यावरल्या माझ्या काळ्या-पांढऱ्या केंसावरून हात फिरवीत हळुहळू आठवण करूं लागलों.

● ● ●

संध्याकाळींच आफ्रिकेंतून गोरे लोक काळ्या लोकांची उचलबांगडी करण्याकरतां जे अनेक क्रूर कायदे करीत आहेत त्याचें वर्णन मीं वाचलें होतें, तें वाचून मी स्वतःशींच दुःखानें उद्गारलों होतों. ' काळे आणि गोरे हीं दोन्ही माणसंच आहेत ना ? दोघांचाहि या जगावर सारखाच हक्क आहे. मग हीं भांडणं हवींत कशाला ? कातडीच्या रंगावर का माणसाची योग्यता अवलंबून आहे ? सशक्तानं दुर्बलाच्या जीवावर जगणं हा जंगलांतला कायदा आहे. पण मनुष्य हा कांहीं अरण्यांत राहणारा हिंस्र पशु नाहीं. पशुत्वांतून बाहेर पडण्याची धडपड करणारी, त्या धडपडींत थोडी कां होईना यशस्वी झालेली, निसर्गाला सर्वस्वीं शरण न जातां प्रसंगीं त्याच्यावर विजय मिळविणारी एका दिव्य शक्तीची ठिणगी आहे ती ! पांच हजार वर्षांपूर्वीच्या वाघाइतकाच आजचा वाघ क्रूर आहे. पण पांच हजार वर्षांपूर्वीं काल्पनिक देवाला प्रसन्न करण्यासाठीं पोटच्या गोळ्याला बळी देणारा मानव आज त्या देवाला घांसभरसुद्धां नैवेद्य न दाखवितां आपल्या पदरांतलें सर्व अन्न अनाथ मुलांच्या पोटांत जाईल अशी काळजी घेऊं लागला आहे. मग—

हे गोरे लोक स्वतःला ख्रिश्चन मानतात. पण ' शेजाऱ्यावर प्रेम करा ' ही ख्रिस्ताची आज्ञा पाळण्याची यांची पद्धत मात्र मोठी विचित्र आहे. यांना गोरेच शेजारी हवेत ! काळे शेजारी दिसले कीं यांचें माथें भडकतें. बिचारा ख्रिस्त ! कांहीं झालें तरी दोन हजार वर्षांपूर्वींचा अडाणी मनुष्य ! भाषेची सूक्ष्मता कळायला तो पढिक पंडित किंवा बडा मुत्सद्दी थोडाच होता ! एकच शब्द—पण तो आपल्या आज्ञेंत घालायचें त्याला कांहीं सुचलें नाहीं ! ' शेजाऱ्यावर प्रेम करा ' असें म्हणण्याऐवजीं ' गोऱ्या शेजाऱ्यावर प्रेम करा ' असें ख्रिस्तानें सांगितलें असतें तर अधिक बरें झालें नसतें का ?

## बुद्धीचा बाजार

१५

बागेंतल्या गुलाबावर नवीन कळी दिसूं लागली म्हणजे लहान बालकाला किंवा आकाशांत एखादा नवा तारा उगवला म्हणजे ज्योति-शास्त्रज्ञाला जो आनंद होतो, तोच एखाद्या नव्या यंत्राचा शोध लागल्याची बातमी वाचली कीं मला होतो. यंत्राविषयींचें माझें हें प्रेम अनेकांना आंधळें वाटण्याचा संभव आहे. पण ज्यांतून यंत्राची संपूर्ण हकालपट्टी झाली आहे, अशा जगाचें चित्र ज्या ज्या वेळीं माझ्या डोळ्यांपुढें उभें राहातें. त्या त्या वेळीं रेताड वाळवंटाची मला आठवण होते. त्या वाळवंटांत फुलबागा निर्माण करण्याचें सामर्थ्य फक्त यंत्रांतच आहे असें मला वाटतें. पृथ्वीला स्वर्गाचें स्वरूप आणण्याची मानवाची सदिच्छा कधींकाळीं सफळ व्हायची असेल तर त्यानें आपल्या दोन मित्रांना कधींही अंतर देतां कामा नये असें मला वाटतें ! हे दोन मित्र म्हणजे आत्मा आणि यंत्र !

आज सकाळीं वर्तमानपत्रें वाचतांना ‘ एक नवें यंत्र ’ या शब्दावर माझी दृष्टि मोठ्या कौतुकानें खिळून राहिली याचें कारण आतां निराळें कशाला सांगायला हवें ? अधाशीपणानें मीं तो मजकूर वाचूं लागलों. भरतीच्या लाटा जशा क्षणाक्षणाला अधिक जोरानें उचंबळून येतात, त्याप्रमाणें माझा आनंद वाढूं लागला. हें एक नुसतें नवें यंत्र नव्हतें. ज्याची उणीव आज कितींतरी वर्षें अत्यंत तीव्रतेनें मला भासत होती असें यंत्र होतें तें ! डॉ. हडसन् होगलंड् आणि डॉ. ग्रेगरी पिंकूस या दोन डॉक्टरांनीं तें शोधून काढलें होतें. त्यांची तोंडओळखसुद्धां नसून या बातमीबरोबर त्यांचे फोटो छापले नव्हते. त्या दोघांना कृतज्ञतेनें आपलें पुढचें एक पुस्तक अर्पण करायचें असें मनांत ठरवून मी ती बातमी पुन्हां वाचूं लागलों.

मानवी बुद्धि किती सूक्ष्म आणि विशाल आहे ! मनुष्याला आलेल्या थकव्याचें

मापन करणारें अद्भुत यंत्र देखील तिनें शोधून काढलें. मला वाटलें—हें यंत्र जितक्या लवकर हिंदुस्थानांत येईल तितकें बरें होईल. थर्मामिटरप्रमाणें ती एक कांचेची छोटी नळी असली तर देवच पावला म्हणायचा. प्रवासांत सुद्धां आपल्याला हें यंत्र बरोबर बाळगतां येईल. आणि मग परवां जसा आपला छळ झाला तसा पुन्हां कुठेंही होऊं लागला तर आपल्याला तो तत्काळ थांबवितां येईल.

त्या दिवशीं मोठ्या मुष्किलीनें साडेतीनला पुण्याच्या स्टेशनावर पोंचून मीं मुंबईची एक्सप्रेस गांठली होती. माझ्या अंगांतून घामाच्या धारा निथळत होत्या. हमालानें गडबडींत सामान खालींच ठेवल्यामुळें पाय आंखडून घेऊन बसण्याशिवाय दुसरी गतिच नव्हती मला ! शेजारच्या जागेवर बसलेल्या गुजराथी भाईंच्या शरीरसंपत्तीचें एरवीं मीं कौतुक केलें असतें ! पण नकळत माझी निम्मी जागा त्यांनीं व्यापली असल्यामुळें भांडवलवाले गरिबांची पिळणूक कशी करतात याचा नवा मासला मला चाखायला मिळत होता. त्यानें तोंडाला आलेला कडवटपणा घालविण्याकरतां मी खिडकींतून बाहेर पाहत होतों. इतक्यांत एक गृहस्थ माझ्यापुढें येऊन उभे राहिले.

'तुम्ही खांडेकरच ना ?' या त्यांच्या प्रश्नाला 'छेः !' असें उत्तर माझ्या मनांत आलें होतें. पण अशा प्रश्नांनीं मनुष्याचा अहंकार जागृत होत असल्यामुळें असो किंवा खोटें बोलण्याचा इथें कांहीं उपयोग होणार नाहीं असें वाटत असल्या-मुळें असो, माणसाच्या मनांतलें उत्तर त्याच्या जिभेवरून सहसा पुढें येत नाहीं.

मी खांडेकर आहे. एवढा कबुलीजबाब माझ्या तोंडांतून बाहेर पडतांच त्या गृहस्थानें माझ्यावर जी प्रश्नांची सरबत्ती सुरू केली. उडते बॉम्ब टाकणाऱ्या विमानांच्या कारखान्यांतूनच ब्रह्मदेवानें त्याची जीभ तयार करून घेतली असावी अशी माझी खात्री झाली. सकाळपासून काम करून आलेल्या थकव्यामुळें मला अगदीं गप्प बसून रहावेंसें वाटत होतें. पण या गृहस्थाच्या तोफखान्यांतून एका-मागून एक प्रश्न माझ्या कानांवर येऊन आदळत होते. धर्मराजाला कुंठित करण्याकरतां असंख्य प्रश्न विचारणारा महाभारतांतला यक्ष त्या दिवशीं आमच्या गाडींत असता तर त्यानें या स्वारीला लगेच साष्टांग नमस्कार घातला असता, याबद्दल मला मुळींच शंका वाटत नाहीं.

हें थकवा मापण्याचें यंत्र जर त्यावेळीं माझ्यापाशीं असतें तर माझा प्रवास

पुष्कळच सुखाचा झाला असता ! तें यंत्र चटकन् खिशांतून काढून आणि स्वतःला लावून मीं तें मुकाट्यानें त्या जिभली बहाद्दरांच्यापुढें धरलें असतें आणि मग—

ही आठवण होऊन वर्तमानपत्रांतल्या त्या बातमीकडे कृतज्ञतेनें पहात मीं एका समाधानाचा सुस्कारा सोडला. कैदेची मुदत संपत आली म्हणजे कैद्याला जसा आनंद होतो तसें आतां मला वाटूं लागलें. मी मनांत म्हणालों, युद्ध संपल्याबरोबर हीं यंत्रें आपल्याकडे येऊं लागतील. हिंदुस्थानांत येणाऱ्या असल्या पहिल्या यंत्राची ऑर्डर आपण आजच्या आज नोंदू या. म्हणजे व्याख्यानाकरतां दारांत धरणें धरून बसलेल्या हरतऱ्हेच्या उत्सवचालकांपासून तोंडची वाफ दवडण्याकरतां आलेल्या रिकामटेकड्या विद्वानापर्यंत अनेक माणसांच्या चक्रव्यूहांत सांपडून आपला जो सध्यां कोंडमारा होतो, तो १९४५ मधें—निदान १९४६ मधें—दूर व्हायला कांहीं हरकत नाहीं. हें यंत्र आपल्याला मिळालें तर आपल्या आयुष्यांत पांच दहा वर्षांची वाढ सुद्धां होईल. नाहीं कुणीं म्हणावें ? मानवजातीवर इतके उपकार करणाऱ्या त्या दोन डॉक्टर संशोधकांना अगदीं आजच्या आज एक अभिनंदनपर पत्र पाठविणें हें आपलें कर्तव्य आहे !

हें कर्तव्य पार पाडण्याकरतां मीं बसलों तेव्हां मात्र माझा हा उत्साह एकदम ओसरला. एक शंका राहून राहून माझ्या मनाला व्याकूळ करूं लागावी. हें यंत्र शोधून काढणाऱ्या संशोधकाच्या कर्तृत्वाविषयीं आणि बुद्धिमत्तेविषयीं वाटणारा आदर अद्यापिही माझ्या अंतःकरणांत कायम होता. पण कुणीतरी माझ्या अंतःकरणाच्या आंतून आर्तस्वरानें म्हणत होतें—'या यंत्राचा उपयोग कुणाला होणार आहे ! श्रीमंतांनाच ना ? नवे बंगले, नवीं औषधें, नवीं वाहनें, नवीं प्रसाधनें, नवीं विनोदसाधनें, नवीं यंत्रें, जें जें नवें जगांत उत्पन्न होत आहे, तें तें ज्याला ज्याची अतिशय जरूरी आहे त्याला कधीं मिळतंय् का !'

माझ्या डोळ्यांपुढें मजुरांच्या असंख्य चाळी उभ्या राहिल्या. संध्याकाळीं थकून आलेल्या लाखों कष्टाळू जीवांचे चेहरे मला दिसूं लागले. रेडिओचा खराखुरा उपभोग जर कुणाला घेतां येईल तर तो यंत्रांच्या अखंड घरघरीनें कान विटून गेलेल्या आणि कामाच्या चरकांत शरीरें पिळून निघालेल्या असल्या अभागी लोकांना, असें माझ्या मनांत आलें. पण त्या बिचाऱ्यांना रेडिओ स्वप्नांतसुद्धां पहायला मिळत नाहीं !

संध्याकाळीं रेडिओवर जे कार्यक्रम होतात ते ऐकणारे लोक निराळेच असतात! सकाळपासून वेळ कसा घालवावा या विवंचनेंत पडलेलें बेकार श्रीमंत मऊ मऊ कोचांवर बसून रेडिओवरून ऐकूं येणाऱ्या प्रेमगीतांत गुंग होऊन जातात आणि शेवटीं त्या गुंगींत रात्रींच्या चैनीचीं सुखस्वप्नें रेखाटूं लागतात! रेडिओचा शोध लावणाराच्या अलौकिक बुद्धीपुढें मस्तक नेहमींच नम्र होतें. रेडिओनें जगाच्या निरनिराळ्या विभागांना अतिशय जवळ आणलें, यांत मुळींच शंका नाहीं. पण बाह्यतः एक होऊं लागलेल्या या जगाच्या अंतरंगाचे आधींच जे दोन विलक्षण तुकडे झाले आहेत, ते सांधण्याचें सामर्थ्य रेडिओंत कुठें आहे? रेडिओचा उपयोग नेहमीं गुलहौशी श्रीमंतांना होतो, आपल्या मुठींत लक्ष्मी कोंडून ठेवण्याची ईर्ष्या बाळगणाऱ्या कोट्याधीश व्यापाऱ्यांना तो होतो, मानवजातीला युद्धाच्या खाईंत लोटणाऱ्या गोअरिंग आणि गोबेल्ससारख्या राक्षसांनाहि त्याचा भरपूर फायदा करून घेतां येतो. पण दिवसभर कष्ट करून कंटाळून गेलेल्या गरिबांना, लक्ष्मीकडे पाठ फिरवून जगाच्या सुखांत भर घालायला निघालेल्या बुद्धिवंतांना किंवा मानवधर्माचा प्रसार करून युद्धं थांबवूं पहाणाऱ्या लहानमोठ्या गांधींना रेडिओचा आतांपर्यंत कितीसा उपयोग झाला आहे? रेडिओ शोधून काढणाऱ्या त्या असामान्य संशोधकाची बुद्धि नकळत विकली गेली आहे. सत्ताधाऱ्यांनीं आणि संपत्तिवाल्यांनीं जगाच्या बाजारांत ती उजळमाथ्यानें विकत घेतली आहे!

माझ्या मनांत आलें. थकव्याचें मापन करणाऱ्या या नव्या यंत्राची आजच्या जगांत हीच गत होणार. सकाळीं सात वाजतां रस्त्याच्या कडेला उशाशीं रिकामी पाटी घेऊन निजलेल्या हमालाला उपासामुळें आलेला थकवा तें कधींच मापणार नाहीं. रातपाळी करून पहांटे अगदीं गळून गेलेल्या मजुरांच्या शरिरांना त्याचा स्पर्श कधींच होणार नाहीं. स्टुडिओंतल्या नटीला चेहऱ्याची रंगरगोटी करून किती थकवा आला हें कळावें म्हणून त्यांचा हरघडी अवश्य उपयोग केला जाईल. मात्र सकाळपासून संध्याकाळपर्यंत प्रखर दिव्यांच्या उष्णतेंत भाजून निघणाऱ्या तिथल्या नोकराची आणि या यंत्राची जन्मांत एकदांहि गांठ पडणार नाहीं! मानेवर खडा ठेवून दिवसभर खर्डेघाशी करणारे कारकून किंवा पोटासाठीं अष्टौप्रहर पोपटपंचीं करणारे शिक्षक यांचा या यंत्राशीं आमरण संबंध येणार नाहीं. रात्रीं दोन दोन वाजेपर्यंत चालणाऱ्या मादक मेजवान्यांमुळें धनिकांना येणारा थकवा किंवा शर्यतीकरतां कराव्या लागणाऱ्या लांबच्या प्रवासांत कलावंतांना येणारी ग्लानि यांचें मापन

करणें येवढेंच या यंत्राचें जगांत कार्य राहील. फार तर मोठमोठीं प्रसूतिगृहें आणि शुश्रूषागृहें चालविणारे बडेबडे डॉक्टर हें यंत्र बाळंतिणीला किंवा रोग्याला दिवसांतून दहा दहा वेळा लावतील आणि आपलीं बिलें व्यवस्थित फुगवितील !

हें यंत्र शोधून काढणाऱ्या संशोधकांची इच्छा त्याचा उपयोग सर्व मानवजातीला व्हावा अशीच असणार !

पण—

आजच्या जगांत हें शक्य आहे का ?

छे : ! आजचें जग बुद्धिवंतांचें नाहीं, संशोधकांचें नाहीं, सज्जनांचें नाहीं, सहृदयांचें नाहीं; तें संपत्तिवाल्यांचें आहे, तें मिरासदारांचें आहे, तें सत्ताधाऱ्यांचें आहे. हे लोक पंडितांची बुद्धि विकत घेतात, जनतेची शक्ति विकत घेतात, शास्त्रज्ञांचें ज्ञान विकत घेतात, कलावंतांची कला विकत घेतात, सत्य, नीति, आत्मा सर्व कांहीं ते विकत घेऊं शकतात !

वेश्यागृहाचे मालक दरिद्री पण सुंदर मुली पैदा करून त्यांच्या तारुण्यावर आणि लावण्यावर जशी आपली चैन जन्मभर चालवितात, त्याप्रमाणें हेहि लोक मानवतेची बुद्धि आणि शक्ति विकत घेण्याचा काळा बाजार मांडून आयुष्यभर स्वर्गसुख उपभोगूं शकतात. आपल्या रंगेल विलासांना आणि स्वार्थी महत्त्वाकांक्षांना धक्का पोहोंचणार नाहीं अशाच प्रकारची समाजाची रहाटी रहावी म्हणून ते अहोरात्र धडपडत असतात !

त्या दोन डॉक्टरांना पत्र पाठविण्याचा विचार अजूनहि माझ्या मनांत घोळत होता. पण आतां मला वाटूं लागलें—त्यांना नुसतें अभिनंदनाचें पत्र लिहिणें चुकीचें होईल.

ज्या संशोधनाचा उपयोग साऱ्या जगाला होऊं शकत नाहीं तें केल्याचा आनंद हा क्षणभंगुर आनंद आहे, बुद्धिविक्रय ही शीलविक्रयाहूनहि अधिक अमंगल अशी गोष्ट आहे, शास्त्रानें सत्तेचा पाठीराखेपणा करणें हें पाप आहे, त्यानें सदैव मानव-धर्माच्या बाजूनेंच उभें राहिलें पाहिजे, असें कांहींतरी या पत्रांत लिहायला हवें ! ज्या दिवशीं मनुष्यांची बुद्धि जगाच्या बाजारांत एखाद्या गुलामाप्रमाणें स्वतःला विकून घेण्याचें नाकारील त्याच दिवशीं या बाजारांत मंदिराचें मांगल्य प्रगट होईल.

तो दिवस लवकर उगवेल का ?

# वेडा हत्ती १६

हत्तीविषयीं लहानपणापासून मला मोठें कौतुक आणि प्रेम वाटत आलें आहे. कधींकाळीं अखिल जगांतील पशु परिषद् भरण्याचा योग आला तर आपल्या भरदार व्यक्तित्वामुळें तो तिचा सहज अध्यक्ष होऊं शकेल आणि प्रास्ताविक भाषण करतांना आपले बारीक डोळे किलकिले करून स्वतःच्या वजनदारपणावर कोटि करीत तो हंशा व टाळ्या घेईल याविषयीं मला कधींच शंका वाटली नाहीं. पण एवढ्यासाठींच मी त्याच्यावर खूष होतों असें म्हणतां येणार नाहीं; त्याचे दाखवायचे दांत निराळे आणि खायचे दांत निराळे असतात म्हणून त्याच्याविषयीं मला प्रेम वाटत असावें असाही तर्क कदाचित् कुणी करील पण दंतवैद्याकडे न जातां दांतांच्या अशा दोन निरनिराळ्या कवळ्या बाळगणाऱ्या मंडळीचा उपसर्ग आयुष्यांत पुष्कळ दिवसांपर्यंत मीं सोसला असला तरी अलीकडे मी असल्या महात्म्यांच्या वाऱ्यालाही उभा राहिनासा झालों आहे. तेव्हां हा तर्कही चुकीचा ठरेल.

हत्तीविषयीं मला लहानपणापासून जें प्रेम वाटत आहे त्याचें खरें कारण म्हणजे 'त्याची बुद्धिमत्ता ! आपल्या पुराणकारांनीं माणसाच्या धडाला हत्तीचे डोकें लावून बुद्धिदात्या गजाननाची मूर्ति निर्माण करण्यांत मोठीच कल्पकता दाखविली आहे यांत शंका नाहीं. माझ्या बाळपणीं सांगलीला आमच्या घराजवळच 'एकदंत्या' नांवाचा एक मोठा सुंदर हत्ती झुलत झुलत उभा असे. त्याला कोणी नारळ दिला तर लगेच तो त्याचीं दोन शकलें करी आणि एक भक्कल नारळ देणाराच्या पदरांत टाकून दुसरें स्वतःच्या तोंडांत टाकी. या बाबतींत देवळांतल्या पुजाऱ्यापेक्षां त्याचा प्रामाणिकपणा नेहमींच उठून दिसत असे. तो नारळाचे जे दोन तुकडे करी ते तरी किती काटेकोरपणानें ! एका वर्तुळाची सफाईनें दोन अर्धवर्तुळें करणाऱ्या एखाद्या रँग्लरनें सुद्धां या बाबतींत त्याचा गंडा बांधावा असें त्याचें कौशल्य होतें.

पुढें शाळेंत जाऊं लागल्यावर हत्तीविषयींच्या अनेक गोष्टी वाचून त्याच्याबद्दलचें माझें मूळचें प्रेम द्विगुणित झालें. हत्तीला नुसतें गणित शास्त्रज्ञाचेंच डोकें नाहीं, त्याला मुत्सद्याचेंही डोकें आहे अशी माझी एका गोष्टीवरून पूर्ण खात्री

झाली. त्या गोष्टींतला शिंपी आपल्या दुकानावरून नदीवर आंघोळ करायला जाणाऱ्या हत्तीला नेहमीं कांहींतरी खायला देई. हत्तीही नेहमीं डोळे मिटून निर्धास्तपणानें तो देई तें खाई. पण एके दिवशीं त्या शिंप्यानें त्याला फसवून खाण्याकरितां म्हणून सुई दिली. ती सुई हत्तीच्या सोंडेला विलक्षण बोंचली. क्षणभर त्याला प्राणांतिक वेदना झाल्या. हत्तीच्या जागीं दुसरा कुठलाही प्राणी असता तर लगेच त्यानें त्या शिंप्यावर झडप घालून आपला सूड उगवला असता! पण हत्ती एखाद्या साधूप्रमाणें शांतपणानें नदीवर गेला. तिथें त्यानें नेहमींप्रमाणें आंघोळ केली. एखादा पवित्र ब्राह्मण नदीवर स्नान करून स्तोत्रें पुटपुटत जसा घरीं येतो तसा तो गंभीरपणानें सोंडेनें कसला तरी आवाज करीत परत येऊं लागला. शिंप्याचें दुकान येतांच तो क्षणभर थांबला आणि शिंपी दारांत दिसतांच सोंडेंत भरून आणलेल्या पाण्यानें त्याला सचैल स्नान घातलें!

हत्तीच्या संयमाच्या, शहाणपणाच्या आणि बुद्धिमत्तेच्या अशा अनेक गोष्टी वाचून मी मनांत अगदीं पक्कें ठरविलें होतें कीं कधींकाळीं कुठल्याही म्युनिसिपालिटीच्या किंवा कौन्सिलच्या निवडणुकीला आपण उमे राहिलों तर 'हत्ती' हीच आपली निशाणी निश्चित करायची; पण माझ्या या अनेक वर्षांच्या आवडत्या कल्पनेला परवां एकदम मोठा धक्का बसला. हत्तीच्या दांतांप्रमाणें त्याच्या बुद्धिमत्तेतही दिखाऊपणाचा भाग मोठा आहे अशी माझी एका बातमीनें खात्री केली. त्याचे डोळे खूप बारीक असले तरी सूक्ष्मदृष्टि अशी त्याला मुळींच नाहीं हेंहि त्या वार्तेवरून सिद्ध झालें. माझ्या मनांत क्रांति घडवून आणणारी ती विचित्र बातमी अशी होती—

## हत्तीनें रेशन नाकारलें.

'फैजपूर येथें गजपन नांवाच्या हत्तीस देण्यांत येणारें अन्न रॅशनिंगमुळें कमी झालें होतें. माहुतानें त्यांत कोंड्याची भर घालून रोजच्या खाद्याची भरती केली. पण हें मिश्रण हत्ती पसंत करीना, तेव्हां हत्तीस थोडा वेळ हिंडून शांत करण्याच्या उद्देशानें माहूत स्वार होत असतांनाच गजपतीनें सोंडेनें त्याला पायाखालीं तुडविलें व ठार केलें.'

ही बातमी वाचून मी अगदीं हतबुद्ध झालों. प्रत्यक्ष सरस्वतीच्या पतीनें-महाभारताच्या लेखनाच्या वेळीं महर्षि व्यासांचा लेखक असलेल्या गजाननानें-ज्याचें

डोकें उसनें घेतलें, त्या प्राण्याच्या डोक्यांत रॅशन नाकारण्याची ही वेडी कल्पना आली तरी कशी ? गेलीं पांच वर्षे जगांत महायुद्ध सुरू आहे, दोस्तराष्ट्रें सत्याच्या संरक्षणाकरतां आणि नीतीच्या विजयाकरतां जिवावर उदार होऊन लढत आहेत, आणि उद्यांच्या जगांत सर्वांना पोटभर जेवायला मिळावें म्हणून आजच्या जगांतल्या बहुतेकांवर पोटाला चिमटा घेऊन रहायची पाळी आहे, इत्यादि गोष्टी या फैजपूरच्या पिसाळलेल्या हत्तीच्या कानांवर कधींच पडल्या नव्हत्या काय ? का देवानें दिलेल्या सुपाएवढ्या कानांचा उपयोग फक्त माशा हांकण्याकरतांच करायचा असतो अशीच या जाड्या पंडिताची समजूत आहे ? रस्त्यानें वर्तमानपत्रें विकत जाणाऱ्या पोऱ्यांच्या नुसत्या आरोळ्या त्यानें चार दिवस ऐकल्या असत्या तरी रॅशन स्वीकारणें हेंच आजकाल प्रत्येक सद्‌गृहस्थाचें कर्तव्य आहे अशी त्याची खात्री झाली असती.

हे फैजपूरच्या गजराजा, रेशनमुळें तुला मिळणारें अन्न कमी झालें म्हणून तूं तें सोंडेच्या फटकाऱ्यानें नाकारलेंस! वेड्या हें मूर्खपणाचें कृत्य करण्याआधीं तूं थोडातरी विचार करायला हवा होतास! सर्वनाशाची पाळी आली म्हणजे अर्ध्या भागावर पाणी सोडण्यांतच शहाणपणा असतो हें संस्कृत सुभाषित तूं कधींच ऐकलें नाहींस काय! स्वराज्य मागणारीं माणसें फुसक्या कौन्सिलावर समाधान मानून आवडीनें नामदारांचें दशावतारी नाटक करीत नाहींत काय ? बंगालमधें कळवळून आणि वळवळून तडफडत तडफडत रस्त्याच्या कडेला मेलेल्या हजारों माणसांपेक्षां तूं हजार पटींनीं भाग्यवान आहेस हें कसें तुझ्या लक्षांत आलें नाहीं ! शिवाय हत्तीची राजेरजवाडयाप्रमाणें बरदास्त ठेवण्याचा जुना जमाना कधींच मागें पडला आहे हें तूं विसरलास! हल्लीं हत्तीचें महत्त्व फक्त दोनच लोकांना कळतें—जंगलांतल्या लांकडाच्या व्यापाऱ्यांना आणि सर्कसवाल्यांना! अशा स्थितींत हिंदुस्थानांतल्या कोट्यावधि लोकांप्रमाणें 'ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें' हा अभंग गुणगुणत आनंदानें अर्धपोटीं रहायाचें सोडून रॅशन नाकारण्याची अवदसा, बाबा, तुला कुठून आठवली ? तुझें हें कृत्य कदाचित् भारत संरक्षण कायद्याखालींसुद्धां येत असेल! नाहीं कुणी म्हणावें ?

हे मूर्ख गजराजा, तुझ्या डोक्यांत मोत्याच्या राशी असतात ही कल्पना तुझ्या इतक्याच वेडया कवींनीं आपल्या डोक्यांतून काढलेली दिसते! या बातमीवरून तुझ्या डोक्यांत नुसते बटाटे भरलेले असावेत असा मला संशय येतो. तुला भरपूर

अन्न खाल्ल्यासारखें वाटावें म्हणून माहुतानें तुला मिळालेल्या रॅशनमध्यें कोंडा घातला हें खरें ! पण त्यांत एवढा राग येण्यासारखें काय होतें बाबा ? या अभागी देशांत गेल्या तीन चार पिढ्या लोक कोंड्याचा मांडा करूनच आपली गुजराण करीत आले आहेत ! अरे गजपतिश्रेष्ठा, हल्लीं अनेक माणसांना कोंडासुद्धां सोन्या-इतका दुर्मिळ झाला आहे ! ठिकठिकाणीं माणसें रताळीं तर रताळीं, पाला तर पाला, जें कांहीं मिळेल तें खाऊन यमराजाची चिठ्ठी चुकवीत आहेत ! अशा स्थितींत राजकीय हक्कांप्रमाणें अन्नाच्या बाबतींतही मिळेल तें पदरांत घ्यावें हा मंडळीचा उपदेशच शेवटीं फायदेशीर ठरतो हें विसरून तूं एकदम इतका जहाल कशाला झालास ? तुझा कुणी दोस्त आठ ऑगस्टच्या चळवळींत तर पडला नव्हता ना ? कोंडा नाकारणें म्हणजे कोंड्यांत व्हिटॅमिन्स असतात या गोष्टीविषयीं आपलें अज्ञान प्रगट करण्यासारखें आहे, याचा बुद्धिवान् असूनहि तूं मुळींच कसा विचार केला नाहींस ? तुझ्या माहुतानें कोंडा घालून तुझ्याकरतां तयार केलेलें अन्न तुला गोड वाटलें नसेल हें मी कबूल करतों. पण जीभ आणि स्त्री यांचे चोचले पुरवि-णाऱ्या पुरुषाचा शेवटीं अधःपात होतो हें सुभाषित तूं या वेळीं आठवायला हवें होतेंस. कुठली तरी जुनी बाजरी खाल्ल्यामुळें अंगाला झालेली खरूज खाजवीत हजारों माणसें भोंवतालीं जगत असतांना एकट्या तुकड्यानें चांगल्या अन्नाचा हट्ट धरणें हें असभ्यपणाचें लक्षण आहे हें तुझ्यासारख्या शिष्ट पशूला समजायला कांहींच हरकत नव्हती !

आणि तुझें तें शेवटचें आततायीपणाचें कृत्य ! गरम झालेलें तुझें मस्तक शांत करण्याकरतां माहुतानें तुला हिंडायला नेण्याचा प्रयत्न केला यांत त्याची काय चूक होती ? पोटांतली आग अन्नानें नसली तरी गार वाऱ्यानें विझेल असें त्या बिचा-ऱ्याला प्रामाणिकपणानें वाटलें असावें ! आम्हीं माणसें सुद्धां नेहमीं हेंच करतों. मूल कसला तरी भलता हट्ट धरून बसलें कीं, आम्ही त्याला आभाळांत नसलेला चांदोबा दाखवितों ! जनता हक्क मागूं लागली की, तिच्या तोंडावर आम्ही कमिट्या आणि कमिशनें फेकतों ! त्या माहुतानेंही तेंच केलें. तो तुला हवा खायला नेत होता ! सर्प हवा खाऊन जगतो असें म्हणतात. ती कला तूं साध्य केली असतीस तर तुझेंसुद्धां दररोज भरपूर पोट भरलें नसतें का ?

पण हवा खाऊन जगण्याच्या बाबतींतल्या स्वतःच्या नालायकीचा सूड तूं त्या बिचाऱ्या माहुतावर उगवलास ! अहिंसेच्या दृष्टीनेंच नव्हे तर दुसऱ्या एका दृष्टीनें

हा तुझा गुन्हा अक्षम्य आहे. तुला वेडयाच्या इस्पितळांतच नेऊन ठेविलें पाहिजे. आपल्या बुद्धिमत्तेचें दिवाळें वाजल्याची कबुली तूं या कृत्यानें दिलीस. वेड्या प्राण्या, तो माहूत म्हणजे काय तुझा श्रीमंत मालक होता ? तो काय जाणून बुजून तुझे हाल करीत होता ? तो काय आपल्या बायकामुलांची चंगळ करण्याकरतां तुला अर्धपोटीं ठेवीत होता ? तोही तुझ्या इतकाच—किंबहुना तुझ्याहूनही अधिक दुर्दैवी असेल ! तो परावलंबी होता, एक यःकश्चित् नोकर होता.

सूड हा प्रीतीचाच सावत्र भाऊ आहे हें मला कळतें. पण आंधळ्या प्रेमाप्रमाणें आंधळया सूडबुद्धीनेंही जगांत अनर्थ ओढवतात. गजराजा, तुला सूड घ्यायचाच होता तर ज्यांनीं या सुवर्णभूमींतला धान्याचा आपल्या अंतःकरणाहूनही अधिक काळा असा बाजार मांडला आहे. शेतकऱ्यांना फसवून त्यांच्या धान्यानें आपलीं कोठारें भरून जे गोरगरिबांच्या सरणावर आपल्या पोळया भाजून घेत आहेत, हातावर पोट असणाऱ्यांच्या तोंडांत माती घालून स्वतःच्या बंगल्यावर सोन्याचीं कौलें चढविण्याच्या राक्षसी कैफांत जे गुंग आहेत, त्या नराधमांपैकीं एखाद्याला तूं ठार मारायला हवें होतेंस !

तूं असा कांहीं चमत्कार दाखविला असतास तर तुझी शूर व्यक्तींत गणना झाली असती ! लोकांनीं तुझी पूजा केली असती. पण आज—

आज जगाच्या दृष्टीनें तूं वेडा ठरला आहेस. दानाप्रमाणे सूडालाहि देश, काल आणि पात्र हीं पहावीं लागतातच !

# निखारे विझत नाहींत १७

अठराव्या शतकाच्या अखेरीला फ्रान्समध्ये झालेल्या राज्यक्रांतीचें वर्णन ज्यावेळीं मीं प्रथम वाचलें तेव्हां पॅरिस शहराविषयीं मला विलक्षण प्रेम वाटूं लागलें. स्वातंत्र्य, समता आणि बंधुता या उदात्त घोषणा हिरिरीनें जगाला ऐकविणारी ही नगरी एखाद्या रणरागिणीप्रमाणें माझ्या डोळ्यापुढें तळपूं लागली. जेथें गांजलेली जनता उघड उघड बंड करूं शकते, पिढ्यान् पिढया मानेवर वाहिलेलें गुलामगिरीचें जूं झुगारून देणारे हजारों स्त्री-पुरुष जिथें निर्माण होऊं शकतात, जुल्मी राजाला देहांत प्रायश्चित्त देण्याचा आपला अधिकार जिथली प्रजा निर्भयपणें गाजवूं शकते,

ती भूमि किती तेजस्वी आणि किती उदात्त असली पाहिजे या कल्पनांत माझें बालमन त्यावेळीं रमून गेलें. पॅरिसजवळून वाहणाऱ्या सीन नदीच्या पाण्यांतला हा गुण आपल्या गंगेंत, गोदेंत, कृष्णेंत किंबहुना कुठल्याही नदींत फारसा कां असूं नये हें कोडें मला त्यावेळीं कांहीं केल्या उलगडेना !

पॅरिस या नांवांत अशी विलक्षण जादू असल्यामुळें मोठेपणीं पॅरिसचा उल्लेख निराळ्या रीतीनें माझ्या कानांवर पडूं लागतांच माझ्या मनाला धक्के बसूं लागले. मी पॅरिसकडे स्वातंत्र्यभूमि म्हणून पहायला शिकलों होतों ! पण जग त्या नगरीचें मिटक्या मारीत रसभरित वर्णन करतांना म्हणत होतें—पॅरिससारखी विलास-भूमि या पृथ्वीच्या पाठीवर दुसरीकडे कुठेंहि सांपडणार नाहीं.

पॅरिसचें तें वैभव, पॅरिसचें तें सौंदर्य, पॅरिसमधले ते विलास—

जीवाची मुंबई करणें ही दरिद्री हिंदुस्थानांतल्या खेडवळ मनुष्याची महत्त्वाकांक्षा असूं शकेल. पण जो खरा सुधारलेला आहे, ज्याला विसाव्या शतकांत जन्माला आल्याचें एक दिवस तरी चीज व्हावें असें मनःपूर्वक वाटत आहे, त्यानें पॅरिस पाहिलेंच पाहिजे, असें कुणीतरी म्हटलें म्हणजे माझ्या काळजाला कांटे टोंचल्यासारखें वाटे ! राहून राहून माझ्या मनांत येई—कालगति किती विचित्र असते ! एकेकाळीं सीन नदीच्या पाण्याला देशभक्तांच्या रक्ताचा रंग चढला होता. आजही त्याच्यावर रक्तिमा असेल ! पण तो मदिरेचा ! पॅरिसच्या ज्या रस्त्यांनीं पूर्वीं वधस्तंभांकडे नेल्या जाणाऱ्या जुलमी सरदारांच्या पायांतल्या शृंखलांचा खणखणाट ऐकला असेल, त्यांना आजकाल रात्रभर ऐकूं येणारा नृत्यांचा छुन-छुमाट ऐकून काय वाटत असेल बरें ? आणि माणसांप्रमाणेंच इमारतींच्या मनांत जुन्या स्मृतींचीं वादळें उठत नाहींत ही फार सुखाची गोष्ट आहे. नाहींतर ती क्रांतीची वेळ आठवून पॅरीसमधलीं आजचीं मंदिरें इतकीं अस्वस्थ होऊन गेलीं असतीं कीं; त्यांना धरणीकंपाचे धक्केच बसत आहेत असा त्यांत विहार करणाऱ्या खुशालचेंडू लोकांना भास झाला असता !

पॅरिस म्हणजे विलासभूमि, पॅरिस म्हणजे उपभोगनगरी, पॅरिस इंद्राची अमरावती, ही कल्पना माझ्या मनाला कशीशीच वाटत असली तरी ती असत्य आहे हें सिद्ध करण्यासारखा पुरावा मला मध्यंतरीच्या काळांत कधींच मिळाला नाहीं. उलट चार वर्षांपूर्वी जेव्हां एका दिवसांत पॅरिस पडलें, कोणत्याही प्रकारचा प्रतिकार न करतां पॅरिस जर्मनांना शरण गेलें ही लाजिरवाणी वार्ता ज्या दिवशीं

मीं ऐकली, त्या दिवशीं इतरांप्रमाणें मीही मनांत म्हणालों—अप्सरांच्या जगांत देवता नांदूं शकत नाहींत हेंच खरें ! अठराव्या शतकाच्या अखेरीला पॅरिसमध्यें स्वातंत्र्यभक्तीचे निखारे फुलले होते. पण विलासांचीं, सुखवस्तुपणाची, गुलामगिरीचा आणि या सर्वांच्या समुच्चयानें येणाऱ्या मानसिक बधिरपणाची राख हळुहळू या निखाऱ्यांवर सांचत गेली आणि ते निखारे पार विझून गेले ! आपल्याकडल्या संस्थानिकांसारखी आणि विद्वानांसारखी पॅरिसची स्थिति झाली !

ज्यांचे पूर्वज आपल्या घोड्यांना अटकेचें पाणी पाजण्यांत आणि आपल्या पराक्रमानें नवीं नवीं राज्यें मिळविण्यांत आनंद मानीत होते, ते संस्थानिक आज टीचभर रंगणांत भाडोत्री स्वारांकडून पिटाळल्या जाणाऱ्या घोड्यांची शर्यत पाहण्यांत आणि त्यांच्यावर पैसे लावून जुगार खेळण्यांत समाधान मानीत आहेत. आपल्या अपमानाचा सूड घेण्याकरतां ज्या चाणक्यानें नंदराजाचें सिंहासन एखाद्या पत्त्याच्या बंगल्याप्रमाणें क्षणार्धात कोसळून घातलें, त्याच्या बुद्धिमत्तेशी स्पर्धा करणारे आमचे आजचे पंडित किराण्या मालाप्रमाणें आपल्या बुद्धीची फुटकळ विक्री करून कारकुनींत जगण्याचा आनंद उपभोगीत आहेत ! मग बिचारें पॅरिस—विलासभूमि म्हणून जगभर गाजलेलें पॅरिस—मुकाट्यानें शत्रूला शरण गेलें यांत नवल कसलें ?

पण परवा अचानक आयुष्यांतला विलक्षण आनंदाचा एक क्षण मला लाभला, ‘ जर्मन दास्यांतून पॅरिस नगरीची मुक्तता ’ हा वर्तमानपत्रांतला ठळक अक्षरांतला मथळा वाचतांच माझें मन आनंदानें फुलून गेलें. या युद्धांत रशियानें करून दाखविलेले अनेक लोकविलक्षण पराक्रम डोळ्यांपुढें उभे असूनही मला पॅरिसविषयींच्या या वार्तेचें कौतुक वाटलें. पॅरिस आपल्या परंपरेला जागलें, स्वातंत्र्याचे पवित्र संस्कार अजून ते विसरले नाहींत ! याचा मला विलक्षण आनंद झाला. दोस्तांचें सैन्य जवळ येतांच पॅरिसमधली फ्रेंच जनता बंड करून उठली. पन्नास हजार सशस्त्र फ्रेंच देशभक्तांनीं या बंडांत भाग घेतला. लाखों नागरिकांनीं त्यांना साहाय्य केलें. पॅरिस ही विलासभूमि राहिली नाहीं, पुन्हां रणभूमि झाली. स्वातंत्र्यलालसेचे निखारे विलासांनीं विझत नाहींत हें या सुंदर नगरीनें पुन्हां एकदां सिद्ध केलें. स्वातंत्र्यासाठीं तडफडणाऱ्या पंख कापले असतांना सुद्धां तो अमृतकुंभ आणण्याकरतां अहोरात्र फडफडणाऱ्या, जुलमी सत्तेनें सप्तपाताळांत गाडून

ठेवलें असलें तरी तिथेंहि रात्रंदिवस धडपडणाऱ्या जगांतल्या साऱ्या आत्म्यांना पॅरिसचा हा पुनर्जन्म एकप्रकारचा दिलासा देत आहे यांत संशय नाहीं. पॅरिस आज जगाला उजळ माथ्यानें बजावून सांगत आहे—'नाझी कितीही बुद्धिमान् असले, त्यांचें राज्यतंत्र कितीही क्रूर असलें, तरी त्यांच्या बळाला आणि छळाला भीक न घालतां फ्रेंच जनतेची स्वातंत्र्याची लालसा कायम राहिली आहे. ती विझलेली नाहीं. चार वर्षे तिनें अज्ञातवासांत काढलीं. पण वेळ येतांच—'

माझ्या मनांत आलें–पांडवांचा अज्ञातवास एका वर्षाचा होता, पॅरिसला अज्ञातवास चार वर्षांचा झाला. कुणा देशाचा किंवा देशभक्ताचा अज्ञातवास किती असेल हें कधींच निश्चित सांगतां येत नाहीं. पण अज्ञातवास–मग तो ध्येयनिष्ठ व्यक्तीचा असो, एखाद्या उदात्त तत्त्वाचा असो, किंवा स्वातंत्र्यासाठीं अधीर झालेल्या राष्ट्र-भक्ताचा असो–आज ना उद्यां संपतोच संपतो–अगदीं यशस्वी रीतीनें संपतो.

लहानपणीं इतिहासाच्या पुस्तकांतून मला आवडूं लागलेलें पॅरिस मधें माझं नावडतें शहर होऊं लागलें होतें. आज मात्र तें मला पूर्ववत् आवडूं लागलें आहे. युद्ध संपल्यावर कुणी श्रीमंत दोस्त मला युरोपच्या प्रवासाला न्यायला तयार असेल तर स्टॅलिनग्राडच्या जोडीनें पॅरिसही बघण्यांत मला मोठी धन्यता वाटेल. माझी खात्री आहे कीं तिथलीं मंदिरें, तिथले रस्ते, तिथले पुतळे, तिथली प्रत्येक वस्तु नि वस्तु फ्रान्सच्या पुढील पिढीच्या कानांत यापुढें एकच अमर संदेश गुणगुणत राहील —

'निखारे विझत नाहींत'




किंमत सवा रुपया

पुरवणी वाचनासाठीं

मंजूर असलेली पुस्तकें

१ कालचीं स्वप्नें
२ स्मृतिलहरी
३ काव्यज्योति
४ मुक्या कळ्या
५ इंद्रधनुष्य
६ गुदगुल्या
७ रंगदेवता
८ सुशिलेचा देव
९ आपण सारे भाऊ
१० गोप्या